


# DADOBA'S

# RUDIMENTARY GRAMMAR.








किंमत एक आणा.

A

# RUDIMENTARY MARÁTHÍ GRAMMAR

BY

RÁO BAHÁDUR DÁDOBÁ PÁNDURANG,

AUTHOR OF A LARGE MARATHI GRAMMAR WITH
A SUPPLEMENT, &c., &c.

---

**SEVENTEENTH EDITION.**—75,000 Copies.

---






Bombay:

PRINTED AND PUBLISHED BY THE PROPRIETOR T. V. PRESS.

---

1892.

---



---

*Price one Anna.*

# मराठी लघु व्याकरण

हें

## रावबाहादूर दादोबा पांडुरंग

मोठें व्याकरण व पूरणिका यांचे कर्ते

यांणीं केलें.

---

आवृत्ति सतरावी.—७५,००० प्रती.

---



मुंबई:
तत्वविवेचक प्रेसचे मालक यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

---

इसवी सन १८९२.

---



---

किंमत एक आणा.

# प्रस्तावना.

पहिल्या शिकणारांस व लहान मुलांस माझ्या मोठ्या व्याकरणाची समजूत पाडण्यास शिक्षकांस फार कठीण पडतें, ह्मणोन पुष्कळ दिवसांपासून बोभाट चालत होता. याकरतां त्याच व्याकरणाचा संक्षेप केला असतां तो बोभाट राहणार नाहीं, असा विचार करून विद्याखात्यांतील अधिकाऱ्यांनीं मलाच तें काम करावयास सांगितलें; त्यावरून संतोषानें हें पुढील संक्षिप्त व्याकरण म्यां रचिलें आहे आणि त्याचें नांव **लघु व्याकरण** असें ठेविलें आहे. मोठ्या व्याकरणांत जो सर्व प्रकरणांवर विस्तार केला आहे तो मात्र यांत काढून टाकिला आहे, परंतु बहुतकरून तीं सारीं प्रकरणें संक्षिप्त रूपानें यांत आणिलीं आहेत; आणि त्यांच्या मूळ पीठिकांचें ज्ञान लहान विद्यार्थ्यांस थोडया आयासानें व्हावें अशा सोप्या रीतीनें तीं सारीं प्रकरणें सांगितलीं आहेत. पुष्कळ वर्षांपासून मोठ्या व्याकरणाची पद्धति बहुधा सर्वत्र चालत आली आहे, ह्मणोन संतोषानें तिचेंच एथें म्यां अनुसरण केलें आहे.

मु० मुंबई, ता० २१ वी नवेंबर, सन १८६९. **दा० पां०.**

**अकरावी आवृत्ति.**

या पुस्तकाची दहावी आवृत्ति माझ्या परोक्ष कोणीं तपासली ती नकळे. तींत पुष्कळ अशुद्धें व मजकुराची असंगतिही आढळली. तीं सर्व म्यां ईत नीट करून ही आवृत्ति तपासली आहे.

ता० २९ वी सप्तेंबर, सन १८७९. **दा० पां०.**

**बारावी आवृत्ति.**

सदरप्रमाणें.

मु० मुंबई, १२ जून, सन १८८२. **दा० पां०.**

# मराठी लघु व्याकरण.

१. शुद्ध कसें बोलावें, आणि शुद्ध कसें लिहावें; तसेंच, हें शुद्ध कां, आणि हें अशुद्ध कां, हें व्याकरण शिकल्यानें समजतें.

२. व्याकरणाचे मुख्य भाग तीन आहेत; ते हे–**वर्णविचार**, **शब्दविचार**, आणि **वाक्यरचना**.

## १. वर्णविचार.

१. वर्णविचारांत **अक्षरांचा** आणि त्यांच्या **अवयवांचा** विचार सांगितला असतो.

४. **वर्ण** ह्मणजे अ पासून ज्ञ पर्यंत जीं मूळ अक्षरें* त्यांतून प्रत्येक.

५. वर्णांमध्यें दोन भेद आहेत–**स्वर** आणि **व्यंजनें**.

६. ज्यांच्या साहाय्यानें अक्षर सिद्ध होतें ते **स्वर**.

७. स्वरावांचून ज्यांचा पूर्ण उच्चार होत नाहीं तीं **व्यंजनें**.

८. स्वर सोळा आहेत;–अ, आ, इ, ई, इ०. अः पर्यंत.

९. यांत–अ, इ, उ, ऋ, ऌ, हे **ऱ्हस्व स्वर**.

१०. आ, ई, ऊ, ॠ, ॡ हे **दीर्घ स्वर**.

११. ए, ऐ, ओ, औ, हे **संयुक्त स्वर**.

१२. अं हा **अनुस्वार**, आणि अः हा **विसर्ग**. अनुस्वार आणि विसर्ग समजण्याकरितां अ या अक्षरावर (–) आणि अ च्या पुढें (:) अशा अनुक्रमें खुणा करून दाखवितात.

१३. यांत ऋ, ॠ, ऌ, ॡ, हे स्वर निवळ मराठी शब्दांत येत नाहींत.

१४. व्यंजनें चौतीस आहेत; क्, ख्, ग्, घ्, ङ्, इ० पासून ळ् पर्यंत.

---

* नियम १७ खालीं पहा.

१५. व्यंजनांचा पूर्ण उच्चार होत नाहीं, ह्मणोन तीं क्, ख्, च्, त्, म्, अशीं लिहून दाखवितात.

१६. क् या व्यंजनास अ हा स्वर मिळविला ह्मणजे क असें पूर्ण उच्चाराचें अक्षर होतें; तसेंच त्यास आ मिळविला असतां का, इ मिळविली असतां कि, उ मिळविला असतां कु, इ० अशीं अक्षरें होतात.

सारे स्वर मिळवून एक बाराखडी लिहून दाखवितों.

**क, का, कि, की, कु, कू, कृ, कॄ, क्लृ, क्लॄ,**
**के, कै, को, कौ, कं, कः.**

यांत बहुधा ऋ, ॠ, ऌ, ॡ, हे स्वर व्यंजनांशीं मिळवून दाखविण्याचा वहिवाट नाहीं, ह्मणोन या पंक्तीस बाराखडी असें नांव आहे.

१७. क्ष् आणि ज्ञ् हीं जोडाक्षरें आहेत. क् आणि ष मिळून क्ष् होतो; ज् आणि ञ् मिळून ज्ञ् होतो.

१८. क पासून म पर्यंत जे वर्ण त्यांचे पांच वर्ग केले आहेत; ते असे:—क ख ग घ ङ;—च छ ज झ ञ;—ट ठ ड ढ ण;—त थ द ध न;—प फ ब भ म. यांस अनुक्रमें, कवर्ग, चवर्ग, टवर्ग, इ० ह्मणतात; आणि पुढें राहिले ते य, र, ल, व, यांस एथें यवर्ग, आणि श, ष, स, ह, ळ, यांस शवर्ग* असें उगीच संज्ञांकरितां ह्मटलें आहे.

## जोडाक्षरें.

१९. दोन अथवा अधिक व्यंजनें जोडून जें एक अक्षर होतें त्यास जोडाक्षर ह्मणावें; जसें—क्क, द्य, स्य, म्रा, श्री, इ०.

२०. कित्येक जोडाक्षरांचा आकार मूळ अक्षरांच्या आकाराहून कांहींसा निराळा असतो, ह्मणोन तीं ओळखतां येत नाहींत; त्यांतून कित्येक एथें दाखवितों.

---

* माझ्या मोठ्या व्याकरणाच्या पूरणिकेंत यांच्या विस्तारानें शास्त्रसंज्ञा दाखविल्या आहेत.

क्त, त्र, क्र, अ० ऋ, त्त, स्त्र, स्छ, द्य, ह्म, श्र, इ०.

२१. र् या व्यंजनास जें अक्षर जोडायाचें त्याच्या माथ्यावर ॅ अशी खूण करितात; ईस रेफ ह्मणतात. जसें–र्म, र्क, र्स, इ०.

## स्थानविचार.

२२. मुखाच्या ज्या स्थानापासून जो वर्ण निघतो तें त्या वर्णाचें स्थान होय.

२३. हीं स्थानें आतां सांगतों:—

अ, आ, कवर्ग, ह, आणि अः यांचें कंठस्थान.

इ, ई, चवर्ग, आणि य, श, यांचें तालुस्थान.

उ, ऊ, पवर्ग, यांचें ओष्ठस्थान.

ऋ, ॠ, टवर्ग आणि र, ष, ळ, यांचें मूर्द्धास्थान.

ऌ, ॡ, तवर्ग आणि ल, स, यांचें दंतस्थान.

ए, ऐ, यांचें कंठतालुस्थान.

ओ, औ, यांचें कंठौष्ठस्थान.

व, याचें दंतौष्ठस्थान.

अं, याचें नासिकास्थान.

२४. नाकांतून जो स्वराचा उच्चार निघतो त्यास अनुस्वार, आणि असा ज्या वर्णाचा उच्चार असतो त्यास अनुनासिक वर्ण ह्मणतात; जसें–अँ, आँ, इँ, उँ, इ०.

याच्या बारीक भेद मोठ्या व्याकरणावरून समजून घ्यावा.

२५. स्वर उच्चारतां जो मध्येंच त्यास घोंटाळा देतात त्यास विसर्ग ह्मणतात; जसें—अः, कः, भिः, उः, इ०. मराठींत विसर्ग नाहीं.

तथापि छिः, थुः, अँः, हे मराठी शब्द उच्चारायास कधीं विसर्ग लागतो.

२६. व्यंजनांच्या वर्गांतले जे शेवटले वर्ण–ङ्, ञ्, ण्,

**न्**, **म्**, यांचीं त्या त्या वर्गाचीं स्थानें असून आणखी यांचें सर्वांचें **नासिकास्थानहि** आहे. हे **अनुनासिक** वर्ण होत.

अनुस्वाराचा उच्चार करितांना त्या अनुस्वारापुढलें जें व्यंजन त्या व्यंजनाच्या वर्गातील शेवटलें जें अनुनासिक त्याचें मध्यें उच्चारण करावें लागतें; जसें—**तंग** यांत अनुस्वारा पुढला वर्ण जो ग त्याच्या वर्गातील अनुनासिक ङ् याचा मध्यें उच्चार होतो, म्हणजे तङ्ग असा त्या अनुस्वाराचा उच्चार होतो; याचप्रमाणें—**रंक, तंटा, पंडित,** धंदा, कुंभार, इ० शब्दांत अनुस्वाराच्या पुढील वर्णाच्या धोरणाप्रमाणें निरनिराळा उच्चार जाणावा.

य, र, ल, व, श, ष, स, ह, हे वर्ण पुढें असतां मागील अनुस्वाराच्या मूळच्या उच्चारांत कांहीं फेर होतो; जसें—**संयोग, संरक्षण, संलग्न, भंवरा, संसार, संहार,** इ०.

२७. मराठी शब्दांच्या शेवटीं अनुस्वार असतां त्यांचें अनुनासिक उच्चारण होतें; जसें—**कां, तूं, तें, जों, तळें,** इ०.

## संधिविचार.

२८. दोन वर्ण जेथें सांधतात, ह्मणजे एकांत एक मिळून जातात, तेथें त्या वर्णांचा **संधि** ह्मणतात; जसें-**वस्त्रान्न**. या शब्दांतील **वस्त्र** शब्दाचा शेवटला **अ** वर्ण, आणि **अन्न** शब्दाचा पहिला **अ** वर्ण, हे दोन एकांत एक मिळून **आ** होऊन **वस्त्रान्न** असा शब्द झाला आहे; यांत **आ** हा त्यांचा **संधि** जाणावा.

याचप्रमाणें—**राम + आश्रय= रामाश्रय.**
**गंगा + अर्पण = गंगार्पण.**
**राजा + आज्ञा = राजाज्ञा.**
**हरि + इच्छा = हरीच्छा.**
**भानु + उदय = भानूदय.**

२९. जेथें दोन स्वर सांधतात तेथें **स्वरसंधि** ह्मणतात.

३०. जेथें दोन व्यंजनें सांधतात तेथें **व्यंजनसंधि** ह्मणतात.

हे संधि संस्कृत शब्दांत होतात; मराठी शब्दांत होत नाहींत; तथापि मराठी भाषेंत संधि झालेले संस्कृत व इतर

शब्द पुष्कळ येतात, ह्मणोन त्यांविषयीं थोडक्यांत मुख्य मुख्य नियम सांगतों.

३१. एका जातीचे स्वर मागें पुढें असले तर त्यांचा **संधि** त्यांच्याच **दीर्घ** स्वरांत होतो.

(यांचीं उदाहरणें वर दिलीं आहेत.)

३२. एका जातीचे स्वर जर नसले तर त्यांचे संधि येणेंप्रमाणें होतात:—

| स्वर. | संधि. | उदाहरणें. |
|---|---|---|
| अ, आ, + इ, ई, | = ए | मुखेंदु, सुरेश्वर, महेश्वर. |
| अ, आ, + उ, ऊ, | = ओ | शीतोष्ण, गंगोदक. |
| अ, आ, + ए, ऐ, | = ऐ | एकैक, मतैक्य. |
| अ, आ, + ओ, औ, | = औ | गंगौघ, भवौषध. |

स्वरसंधीचे आणखी नियम, आणि व्यंजनसंधीचे सारे नियम जाणायाचे असल्यास माझ्या मोठ्या व्याकरणांतलें संधिप्रकरण पहावें.

## २. शब्दविचार.

३३. ज्यापासून कांहीं अर्थ उत्पन्न होतो तो **शब्द**. (मो० व्या० नि० ५१. पृ० २० पहा). शब्दांच्या योगानें भाषा होत्ये.

३४. शब्द दोन प्रकारचे असतात; **सिद्ध** आणि **साधित**.

३५. जे शब्द इतर शब्दांपासून निघाले नसतात ते **सिद्ध** शब्द; जसें—लांकूड, धोंडा, हात, पाय, तोंड, इ०.

३६. जे शब्द इतर शब्दांपासून साधतात, ते **साधित** शब्द होत; जसें—लांकडी, धोंडफोड्या, हातचें, तोंडचें, विद्वान्, शास्त्री, इ०.[१]

३७. या साधित शब्दांचा **सामासिक** ह्मणोन आणखी एक प्रकार आहे. दोन अथवा अधिक शब्दांचा समास होऊन ह्मणजे कांहीं अर्थ ठेऊन ते मिळून जो एक शब्द होतो, तो

**सामासिक** शब्द ह्मणावा; जसें—आईबाप, बहिणभाऊ, विटिदांडू साखरभात चक्रपाणि, इ०.

३८. आणखी शब्दांचे **सविभक्तिक** आणि **अविभक्तिक** (अथवा **अव्यय**) असे दोन भेद आहेत.

३९. ज्या शब्दांवरून विभक्तींचीं कार्यें होतात, ह्मणजे ज्यांस विभक्ति लागतात, ते **सविभक्तिक** शब्द. असें—रामा, घर, मीं, तूं, जाणें, येणें, इ०.

४०. ज्या शब्दांवरून विभक्तींचीं कार्यें होत नाहींत, ह्मणजे ज्यांस विभक्ति लागत नाहींत, ते **अविभक्तिक** शब्द (अथवा **अव्ययें**) जाणावीं; जसें—आणि जर, सटकन, खालीं, वर, जात, येत, इ०.

४१. मराठी भाषेंत शब्दांच्या आठ जाति आहेत; त्यांत सविभक्तिकांत चार; **नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद**; आणि अविभक्तिकांत अथवा अव्ययांत चार; **क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी**, आणि **केवलप्रयोगी.**

४२. **नाम** ह्मणजे प्रत्येक पदार्थाचें नांव; जसें—माणूस, पोथी, लेखणी, राग, मन, इ०.

४३. **सर्वनाम** ह्मणजे नामाचा वारंवार उच्चार न व्हावा ह्मणोन केव्हां केव्हां त्या नामाच्या ठिकाणीं जो शब्द येतो तो; जसें—मीं, तूं, हा, जो, असें, कोण, इ०.

४४. **विशेषण** ह्मणजे नामाचा गुण दाखविणारा जो शब्द तो; जसें—बरा, वाईट, काळा, गोरा, लंगडा, शहाणा, मूर्ख, इ०.

४५. **क्रियापद** ह्मणजे ज्या शब्देंकरून कोणत्याही क्रियेचा अथवा स्थितीचा बोध होतो तो शब्द; जसें—करणें, बोलणें, चालणें, निजणें, असणें, इ०.

४६. **क्रियाविशेषण** ह्मणजे ज्या शब्देंकरून क्रियांच्या

गुणांचा अथवा प्रकारांचा बोध होतो तो शब्द; जसें—हळू, झटकन, लौकर, फडफड, इ०.

४७. **उभयान्वयी** ह्मणजे ज्या शब्दाच्या योगेंकरून दोन शब्द अथवा दोन वाक्यें यांचा अन्वय होतो तो शब्द; जसें—आणि, व, जर, तर, परंतु, इ०.

४८. ***शब्दयोगी** ह्मणजे ज्या शब्दाचा प्रयोग नामवाचक शब्दावरून होतो, आणि ज्या नामवाचक शब्दाशीं याचा संबंध असतो, त्याचें याच्या योगानें सामान्यरूप होतें; जसें—वर, खालीं, कडे, मध्यें, पुढें, मागें, समोर, इ०. यांत **शुद्धशब्दयोगी** अव्यय ह्मणोन एक उपभेद आहे त्याच्या योगानें हें सामान्यरूप होत नाहीं.

४९. **केवलप्रयोगी** ह्मणजे ज्या शब्दाच्या योगानें मनाच्या उद्गाराचा बोध होतो तो शब्द; जसें—अहा, छिः, वाहवा, अँः, बबब, इ०.

## ( अ ) नामविचार.

५०. नाम ह्मणजे प्रत्येक पदार्थाचें नांव; जसें—मनुष्य, पोथी, लेखणी, राग, मन, इ०.

मग त्या पदार्थाचें ज्ञान इंद्रियांस होऊ, अथवा मनासच होऊ. घोडा प्रत्यक्ष डोळ्यांनें पाहतां येतो; शब्द कानानें ऐकतां येतो; गोडी जिभेनें कळल्ये; परंतु—आनंद, दुःख, लोभ, हेवा, हे मनाचे विकार मनासच समजतात, तथापि हीं सारीं नामें होत.

५१. नामांत **सामान्य, विशेष,** आणि **भाववाचक,** असे तीन भेद आहेत.

५२. **सामान्य नाम** ह्मणजे जातिवाचक शब्द, ज्यांत त्या जातीचा धर्म अनेकांवर असतो; जसें—मनुष्य, झाड, जनावर, घर, इ०.

यांत मनुष्य ह्मटलें ह्मणजे सारीं मनुष्यें, एकच मनुष्य नाहीं; हा जातिवाचक शब्द होय.

९३. **विशेष नाम** ह्मणजे एक एक व्यक्तीचा वाचक जो शब्द तो; जसें–रामा, गोविंदा, काशी, गंगा, इ०.

यांत—रामा, गोविंदा, गंगा, ही एक एक व्यक्ति होय. ठेविलेलीं जितकीं नामें तितकीं सारीं विशेष नामें जाणावीं.

९४. पदार्थांचा भाव अथवा धर्म ज्या नामांनीं जाणिला जातो तीं सारीं **भाववाचक नामें** जाणावीं; जसें–मनुष्यपण, देवपण, नीचपण, माणुसपणा, मोठाई, गुलामी, शत्रुत्व, मित्रत्व, रसिकता, कोमलता, क्रौर्य, माधुर्य, इ०. (हे साधित शब्द जाणावे.)

९५. नामास **लिंग, वचन,** आणि **विभक्ति,** हीं असतात.

## लिंगविचार.

९६. नाममात्रास **लिंग** असतें. लिंगें तीन आहेत.—**पुल्लिंग, स्त्रीलिंग,** आणि **नपुंसकलिंग.**

९७. ज्या नामावरून पुरुष जातीचा बोध होतो, अथवा ज्यास **तो** हें सर्वनाम लागतें, त्या नामाचें **पुल्लिंग** जाणावें; अथवा तीं नामें पुल्लिंगीं आहेत असें ह्मणावें; जसें–पुरुष, घोडा, बैल, आंबा, खांब, पेरू, इ०.

९८. ज्या नामावरून स्त्रीजातीचा ह्मणजे बायको जातीचा बोध होतो, अथवा ज्यास **ती** हें सर्वनाम लागतें, त्या नामाचें **स्त्रीलिंग** जाणावें; अथवा तीं नामें स्त्रीलिंगीं आहेत असें ह्मणावें; जसें–बायको, गाय, घोडी, चिंच, दऊत, लेखणी, इ०.

९९. ज्या नामावरून पुरुष जातीचा अथवा स्त्रीजातीचा बोध होत नाहीं, परंतु बाकी राहिलेल्या नपुंसक जातीचा बोध होतो, अथवा ज्यास तें हें सर्वनाम लागतें, त्याचें **नपुंसकलिंग** जाणावें; अथवा तीं नामें नपुंसकलिंगीं आहेत असें ह्मणावें; जसें-मूल, वासरूं, पाखरूं, घर, पान, फूल, दहीं, लोणी, केळें, इ०.

या भाषेंत निर्जीव पदार्थांचीं वाचक जीं नामें त्यांस अशीं लिंगें मानिलीं आहेत ह्मणोन नामांचीं लिंगें समजणें कठीण पडतें.

६०. हीं लिंगें समजण्याची सोपी रीत अशी आहे कीं, ज्या नामाच्या मागें **तो** हें सर्वनाम लागतें त्याचें पुल्लिंग, **ती** लागतें त्याचें स्त्रीलिंग, आणि **तें** लागतें त्याचें नपुंसकलिंग; जसें—तो आंबा, ती लेखणी, तें घर, इ०.

६१. कित्येक प्राणिवाचक पुल्लिंग नामांस पुढें **इण** प्रत्यय लाविला ह्मणजे त्याच प्राण्याच्या स्त्रीजातींचीं वाचक अशीं नामें होतात; जसें—

| पु० | स्त्री० |
|---|---|
| **सुतार** | **सुतारीण.** |
| **सोनार** | **सोनारीण.** |
| **वाघ** | **वाघीण.** |
| **सिंह** | **सिंहीण.** |

६२. तीं पुल्लिंग नामें आकारान्त असलीं तर स्त्रीलिंगीं **ई**, आणि नपुंसकलिंगीं **एँ**, हे त्यांस प्रत्यय लागतात; जसें—

| पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|
| **मुलगा** | **मुलगी** | **मुलगें.** |
| **कुत्रा** | **कुत्री** | **कुत्रें.** |
| **लांडगा** | **लांडगी** | **लांडगें** |
| **बकरा** | **बकरी** | **बकरें.** |
| **इ०.** | **इ०.** | **इ०.** |

## वचनविचार.

६३. **वचनें** दोन आहेत—**एकवचन**, आणि **अनेकवचन** अथवा **बहुवचन.**

६४. ज्या नामाची एक संख्या असत्ये त्याचें **एकवचन;** जसें—मुलगा, घोडा, पागोटी, केळें, नारिंग, इ०.

६५. ज्या नामाची एका पेक्षां अधिक संख्या असत्ये त्याचें **अनेकवचन;** जसें—मुलगे, घोडे, पागोट्या, केळीं, नारिंगें, इ०.

६६. या भाषेंत नामाच्या अंत्य ह्मणजे शेवटल्या स्वरावरून एकवचनांतले शब्द अनेकवचनांत आणितात; जसें—

| | एकवचन. | अनेकवचन. | |
|---|---|---|---|
| पुल्लिंग. | खांब, वाघ, सुतार. | खांब, वाघ, सुतार. | पुल्लिंग. |
| | बकरा, मेंढा, आंबा. | बकरे, मेंढे, आंबे. | |
| | न्हावी, तेली, कोळी. | न्हावी, तेली, कोळी. | |
| | पेरू, लाडू, परभू. | पेरू, लाडू, परभू. | |
| | टाहो, लाहो, डोहो. | टाहो, लाहो, डोहो. | |
| स्त्रीलिंग. | आत, वेळ, सून. | आता, वेळा, सुना. | स्त्रीलिंग. |
| | खीळ, भिंत, जर. | खिळी, भिंती, जरी. | |
| | पागा, जागा, टीका. | पागा, जागा, टीका. | |
| | रीति, रुचि, भक्ति. | रीति, रुचि, भक्ती. | |
| | काठी, नदी, चुलती. | काठ्या, नद्या, चुलत्या. | |
| | सासू, अळू, आऊ. | सास्वा, अळवा, जावा. | |
| | बायको,............... | बायका................ | |
| नपुंसकलिंग. | घर, फूल, देऊळ. | घरें, फुलें, देउळें. | नपुंसकलिंग. |
| | मिरीं, मोतीं, केंबरीं. | मिऱ्यें, मोत्यें, केंबऱ्यें. | |
| | वासरूं, पाखरूं, पारडूं. | वासरें, पाखरें, पारडें. | |
| | तारूं, आसूं, गळूं. | तारवें, आसवें, गळवें. | |
| | भांडें, तळें, बोलणें. | भांडीं, तळीं, बोलणीं. | |

६७. ज्या नामांचे उपांत्य ह्मणजे शेवटल्या वर्णाच्या अलीकडले स्वर (दीर्घ) ईकार अथवा दीर्घ ऊकार असतात, त्यांच्या अनेकवचनीं ते उपांत्य स्वर ऱ्हस्व होतात; अथवा कोठें कोठें त्या उपांत्यांच्या जागीं अ आदेश होतो; जसें—

| एकव० | अनेकव० |
|---|---|
| परभीण | परभिणी. |
| बटीक | बटिकी, बटकी. |
| कुंभारीण | कुंभारिणी, कुंभारणी. |
| कोशिंबीर | कोशिंबिरी, कोशिंबरी. |

१८. जर तो उपांत्य स्वर केवळ ई अथवा ऊ असला, तर विकल्पें ई च्या जागीं य, आणि ऊ च्या जागीं व, असे आदेश होतात; जसें—

| एकव० | अनेकव० |
|---|---|
| **बाईल, ताईत** | **बाइली, बायली; ताइती, तायती.** |
| **कऊल, देऊळ** | **कउलें, कवलें; देउळें, देवळें.** |

( या वचनप्रकरणीं आणखी बारीक नियम पुष्कळ आहेत, ते पहावयाचे असल्यास माझें मोठें व्याकरण पहावें. )

## विभक्तिविचार.

१९. कोणत्याही नामाचा इतर नामांशीं अथवा क्रियेशीं संबंध दाखवायाचा असतां त्यास आठ विभक्तींतून एक विभक्ति असल्ये; त्यांचीं नांवें, आणि त्यांचे प्रत्यय, पुढें दाखविल्याप्रमाणें जाणावे.—

| **विभक्ति.** | **प्रत्यय.** एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्रथमा. | ही विभक्ति असतां (प्राय: एकवचनीं व क्वचित् अनेकवचनीं) नामाचें मूळचें रूप तसेंच राहतें. | |
| द्वितीया. | **स. ला. तें.** | **स. ला. नां. तें.** |
| तृतीया. | **नें. एं. शीं.** | **नीं. हीं. ई. शीं.** |
| चतुर्थी. | **स. ला.** | **स. ला. नां.** |
| पंचमी. | **ऊन. हून.** | **ऊन. हून.** |
| षष्ठी. | **चा. ची. चें.** | **चा. ची. चें.** |
| सप्तमी. | **तें. ई. आं.** | **तें. ई. आं.** |

**संबोधन. नामांच्या अंत्य स्वरावरून या विभक्तीचीं रूपें निरनिराळीं होतात. अनेकवचनीं या रूपास नों हा प्रत्यय लागतो.**

आतां नामास हे प्रत्यय लावून विभक्तींचीं रूपें दाखवितों.

| विभक्ति. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्रथमा. | वाघ. | वाघ. |
| द्वितीया. | वाघास–ला–तें. | वाघांस-ला-नां-तें. |
| तृतीया. | वाघानें-शीं. | वाघांनीं–हीं–शीं. |
| चतुर्थी. | वाघास–ला. | वाघांस–ला–नां. |
| पंचमी. | वाघाहून. | वाघांहून. |
| षष्ठी. | वाघाचा–ची–चें. | वाघांचा–ची–चें. |
| सप्तमी. | वाघांत. | वाघांत. |
| संबोधन. | वाघा. | वाघांनो. |

७०. नामाच्या लिंगाप्रमाणें आणि अंत्य स्वराप्रमाणें त्याच्या अंत्य स्वरास विकार होऊन विभक्तींचीं रूपें साधतात; जसें—

पुल्लिंग.

**घोडा**–घोडयास-ला; घोडयानें-शीं; घोडयाचा-ची; इ०.
**रवि**–रवीस-ला; रवीनें-शीं; रवीचा; रवींत; इ०.
**तेली**–तेल्यास-ला; तेल्यानें-शीं; तेल्याहून; तेल्याचा; इ०.
**भानु**–भानूस-ला; भानूनें-शीं; भानूचा; भानूंत; इ०.
**पेरू**–पेरूस-ला; पेरूनें-शीं; पेरूचा; इ०.
**लाडू**–लाडवास-ला; लाडवानें-शीं; लाडवाचें; लाडवांत इ०.
**तट्टू**–तट्टास–ला; तट्टानें–शीं, तट्टाचा; इ०.

स्त्रीलिंग.

**आत**–आतेस-ला; आतेनें-शीं; आतेचा-ची; **अने०**–आतांस-नां; आतांचा–ची; इ०.
**भिंत**–भिंतीस-ला; भिंतीनें-शीं; भिंतीचा; **अने०**–भिंतींस-नां; इ०.
**जागा**–जागेस-ला; जागेनें-शीं; जागेंत; **अने०**–जागांस; जागांनीं; जागांत; इ०.
**भक्ति**–भक्तीस-ला; भक्तीनें-शीं; भक्तींत; इ०.
**हवेली**–हवेलीस-ला; हवेलीनें-शीं; हवेलीचा-ची; हवेलींत; **अने०**–हवेल्यांचा; हवेल्यांत; इ०.

**धेनु**—धेनूस-ला; धेनूनें-शीं; धेनूंत; इ०.

**सासू**—सास्वेस-ला; सास्वेनें-शीं; **अने०**—सास्वांचा; सास्वांत; **अथवा**—सासूस-ला; सासूनें-शीं **अने०**—सासूंचा; सासूंत; इ०.

**बायको**—बायकोस-ला; बायकोनें—शीं; **अने०**—बायकांनीं; बायकांचा; इ०.

नपुंसकलिंग.

**घर**—घरास-ला; घरानें-शीं; घराचा; घरांत; घरीं; **अने०**-घरांचा; घरांत, घरीं; इ०.

**पाणी**—पाण्यास-ला; पाण्यानें-शीं; पाण्याचा; पाण्यांत; इ०.

**तारूं**—तार्वास-ला; तार्वानें-शीं; तार्वाचा; **अ०**-तार्वाचें; इ०.

**वासरूं**—वासरास-ला; वासरानें-शीं; वासराचा; **अने०**—वासरांचें; इ०.

**भांडें**—भांड्यास—ला; भांड्यांचा; भांड्यांत; इ०.

७१. नामाचा उपांत्य स्वर ( ह्मणजे शेवटल्या वर्णाजवळचा स्वर ) जर ( दीर्घ ) **ई** अथवा ( दीर्घ ) **ऊ** असला तर त्या उपांत्यास ( ऱ्हस्व ) **इ** अथवा ( ऱ्हस्व ) **उ** होऊन विभक्तिप्रत्यय लागतात; कोठें कोठें **अ** आदेश होतो. आणि जर ते उपांत्य केवळ **ई** अथवा **ऊ** च असले तर त्यांच्या स्थानीं विकल्पें **य** आणि **व** होऊन विभक्तींचीं रूपें साधतात; जसें—

**बुरूड**—बुरुडास—ला, बुरडास-ला; बुरुडाचा; बुरडाचा; इ०.

**लांकूड**—लांकडास—ला; लांकडानें—शीं; **अने०**—लांकडांला; लांकडांचा; इ०.

**ताईत**—ताइतास-ला; तायतास-ला; **अने०**—ताइतांनीं, तायतांनीं; इ०.

**बाईल**—बाइलेस-ला, बायलेस-ला; बाइलेचा, बायलेचा; इ०.

**दऊत**–दउतीस-ला, दवतीस-ला; दउतीचा, दवतीचा; इ०.
**देऊळ**–देउळास-ला, देवळास-ला; देउळाचा, देवळाचा; इ०.

७२. नामाचा अंत्य वर्ण जर **च, ज, झ,** ( दंत्य ) अथवा **स** असला तर कित्येक शब्दांत विभक्तीच्या योगानें तो वर्ण अनुक्रमें **च, ज, झ,** ( तालव्य ) अथवा **श** होतो जसें—

**चमचा**–चमचास-ला; चमचानें-शीं; **अने०**–चमच्यांचा; इ०.
**राजा**–राजास-ला; राजानें-शीं; **अने०**–राजांचा; राजांत; इ०.
**कांच**–कांचेस-ला; कांचेनें-शीं; कांचेंत; **अने०**–कांचांत; इ०.
**मासा**–माशास-ला; माशानें-शीं; माशाचें; **अने०**–माशांनां; माशांनीं; माशांचें; इ०.
**भरंवसा**–भरंवशाला; भरंवशानें; भरंवशाचा; इ०.

७३. द्वितीयादि विभक्तींचे जे वर प्रत्यय सांगितले त्यांच्या ठिकाणीं अव्ययें येऊनही त्या त्या विभक्तींचे अर्थ साधतात. त्यांतून मुख्य अव्ययें सांगतों.—

## विभक्तीचे अर्थ सुचविणारीं अव्ययें.

**विभक्ति.** **अव्ययें.**

द्वि० प्रत, लागीं. **उदाह०**–पुरुषा प्रत, पुरुषा लागीं.

तृ० करून, द्वारें, मुळें, कडून. **उदाह०**–बाणें करून, त्याच्या द्वारें, पुरुषा मुळें, पुरुषा कडून.

च० कारणें, करतां, साठीं, स्तव. **उदाह०**–पुरुषा कारणें, पुरुषा करतां, पुरुषा साठीं, पुरुषा स्तव.

पं० पेक्षां, पासून, कडून, वरून. **उदाह०**–पुरुषा पेक्षां, पुरुषा पासून, पुरुषा कडून, पुरुषा वरून.

ष० संबंधी. **उदाह०**–पुरुषा संबंधी.

स० मध्यें, ठायीं, विषयीं. **उदाह०**–पुरुषा मध्यें, पुरुषा विषयीं; त्याच्या ठायीं.

सं०—ए अरे, अगा, अगे, **अने०**—अहो. **उदाह०**—अरे पुरुषा, अगा देवा, अगे रमे; **अने०**—अहो मुलांनों.

७४. विभक्तिप्रत्यय लावायाचे पूर्वी जें शब्दाचें रूप सिद्ध होतें त्यास **सामान्यरूप** म्हणतात; जसें—**वाघ** याचें **वाघा**, **तारूं** याचें **तार्वा**, **कांच** याचें **कांचे**, **गंगा** याचें **गंगे**, **सासू** याचें **सास्वे**; हीं सामान्यरूपें जाणावीं.

(हा विभक्तिविचार मोठ्या व्याकरणांत सविस्तर रूपानें केला आहे तो पहावा.)

## ( आ ) सर्वनामविचार.

७५. नामाचा उच्चार वारंवार न व्हावा म्हणोन त्या नामाच्या ठिकाणीं जो शब्द येतो तें **सर्वनाम** जाणावें; जसें—मीं, तूं, तो, हा, जो; इ०.

‘रामानें बाळास सांगितलें कीं, मीं पुस्तक वाचतों तें तूं वाच.’ या वाक्यांत मीं, तें, आणि तूं, हे शब्द रामा, पुस्तक आणि बाळा या नामांचा पुनः पुनः उच्चार न व्हावा म्हणोन आले आहेत. हीं सर्वनामें जाणावीं.

७६. सर्वनामाचे पांच भेद आहेत; **पुरुष**, **दर्शक**, **संबंधी**, **प्रश्नार्थक**, आणि **सामान्य**.

७७. पुरुष सर्वनामास तीन पुरुष असतात; **प्रथम** पुरुष, **द्वितीय** पुरुष, आणि **तृतीय** पुरुष.

| | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्रथम पुरुष. | **मीं.** | **आह्मीं.** |
| द्वितीय पुरुष. | **तूं.** | **तुह्मीं.** |
| तृतीय पुरुष. | **तो, ती, तें.** | **ते, त्या, तीं.** |

७८. जें सर्वनाम जवळचा अथवा दूरचा पदार्थ दाखवितें तें **दर्शक** सर्वनाम होय; जसें—‘हा घोडा,’ ‘तो घोडा;’ यांत **हा** आणि **तो** हीं **दर्शक** सर्वनामें; याच प्रमाणें **इतका**, **एवढा**, **असा**; **तितका**, **तेवढा**, **तसा**, इ०.

७९. **हा**, **तो**, यांचीं स्त्रीलिंगीं **ही**, आणि **ती**, आणि नपुंसकलिंगीं **हें**, आणि **तें**, अशीं रूपें होतात.

८०. अनेकवचनीं पुल्लिंगीं **हे**, **ते**; स्त्रीलिंगीं **ह्या** अ० **या**, **त्या**; आणि नपुंसकलिंगीं **हीं**, **तीं**; अशीं रूपें होतात. याचप्रमाणें इतर शब्दांचीं लिंगवचनाप्रमाणें रूपें जाणावीं.

८१. जें सर्वनाम दर्शक सर्वनामाशीं संबंध ठेवितें, तें **संबंधी सर्वनाम** जाणावें; जसें—**जो**, **जितकीं**, **जेवढें**, **जसें**. यांचा संबंध नित्य **तो**, **तितकीं**, **तेवढें**, **तसें**, या दर्शक सर्वनामाशीं असतो; **उदाह०**—'**जो** चोरी करितो **त्यास** दंड होतो,' '**जितके** पहावे **तितके** उद्योगी,' इ०.

८२. प्रश्न करावयाचा असतां जें सर्वनाम येतें तें **प्रश्नार्थक** सर्वनाम जाणावें; जसें—**कोण**, **कोणतीं**, **काय**, **कसें**, **केवढें**, **कितका**, इ०. **उदाह०**—तो **कोण** आहे? हें **काय** आहे? तीं **केवढीं** मनुष्यें होतीं? इ०.

८३. ज्याचा अर्थ सामान्येंकरून होतो, तें **सामान्य** सर्वनाम जाणावें; जसें—**कोणी**, **अमका**, **सर्व**, **अवघा**, **भलता**, **कितीएक**, इ०.

८४. सर्वनामांस नामाप्रमाणें सर्व विभक्ति लागतात; आणि त्यांच्या योगानें यांचीं रूपेंही फार बदलतात, त्यांतून थोडीं खालीं दाखवितों.

**विभक्तींचीं रूपें.**

**मीं**—**द्वि**०—**च**०—मला, मातें; **तृ**०—मीं अ० म्यां; **पं**०—मजहून; **ष**०—माझा; **स**०—माझ्यांत.

**आह्मीं**—**द्वि**०—**च**०—आह्मांला; **तृ**०—आह्मीं; **पं**०—आह्मांहून; **ष**०—आमचा; **स**०—आमच्यांत.

**तूं**—**द्वि**०—**च**०—तुला; **तृ**०—तूं अ० त्वां; **पं**०—तुजहून; **ष**०—तुझा; **स**०—तुझ्यांत.

**तुह्मीं**—**द्वि०**—**च०**—तुह्मांला; **तृ०**—तुह्मीं; **पं०**—तुह्मांहून; **ष०**—तुमचा; **स०**—तुमच्यांत.

**तो, तें**—**द्वि०**—**च०**—त्याला; **तृ०**—त्याणें-नें; **पं०**—त्याहून; **ष०**—त्याचा; **स०**—त्यांत-त्याच्यांत.

**ती**—**द्वि०**—**च०**—तिला-तीस; **तृ०**—तिणें-नें; **पं०**—तिजहून; **ष०**—तिचा-ची; **स०**—तींत-तिच्यांत.

**ते, त्या, तीं**—**द्वि०**—**च०**—त्यांना; **तृ०**—त्याहीं-णीं-नीं; **पं०**—त्यांहून; **ष०**—त्यांचा; **स०**—त्यांत-त्यांच्यांत.

**हा, हें**—**द्वि०**—**च०**—याला-ह्याला; **तृ०**—याणें-नें-ह्यानें; **पं०**—याहून; ह्याहून; **ष०**—याचा-ह्याचा; **स०**—यांत-ह्यांत—याच्यांत-ह्याच्यांत.

**ही**—**द्वि०**—**च०**—इला; **तृ०**—इणें; **पं०**—इजहून; **ष०**—इचा; **स०**—ईंत-इच्यांत. क्वचित् हिला, हिणें, हिचा, इ०.

**हे, ह्या** अ० **या, हीं**—**द्वि०**—**च०**—यांना; **तृ०**—यांहीं-णीं; **पं०**—यांहून-यांजहून; **ष०**—यांचा; **स०**—यांत-यांच्यांत.

कोणी ह्याला, ह्याणें, ह्याणीं, हिणें, अशा प्रकारचीं रूपें लिहितात.

या सर्वनामांचीं सामान्यरूपें—**मज, तुज, त्याज, तिज, त्याच्या, आमच्या, तुमच्या,** इ० अशीं होतात.

( शिक्षकानें मुलांकडून अभ्यासाकरतां या अवघ्या सर्वनामांचीं सर्व विभक्तींचीं रूपें लिहवावीं. )

### ( इ ) विशेषणविचार.

८९. नामाचा गुण किंवा त्याची संख्या दाखविणारा जो शब्द तें विशेषण जाणावें; जसें—**बरा, वाईट, काळा, गोरा, लंगडा, शाहणा, मूर्ख,** इ०.

८६. विशेषण ज्या नामाचा गुण दाखवितें तें नाम त्याचें **विशेष्य** होय; जसें—'शाहणा मुलगा,' 'लंगडी गाय.' यांत

१ ल्या उदाहरणांत **शाहणा** या विशेषणाचें **मुलगा** हें **विशेष्य** होय; आणि २ ऱ्या उदाहरणांत **लंगडी** या विशेषणाचें **गाय** हें **विशेष्य** होय.

८७. मराठींत विशेष्याच्या लिंगवचनांप्रमाणें **आकारान्त** विशेषणाचें रूप बदलतें; जसें—**शाहणा** मुलगा, **शाहणी** मुलगी, **शाहणें** मुलगें, **शाहण्या** मुलग्या, **शाहणीं** मुलगीं, इ०.

आकारान्त म्हटलें यावरून अकार, इकारादि स्वर विशेषणाच्या अंतीं असले तर विशेष्याच्या लिंगवचनांप्रमाणें त्या विशेषणांचीं रूपें न बदलतां जशींचीं तशींच राहतात; जसें—सुंदर घोडा, सुंदर चित्र, लाल फुलें, गोड जिलब्या, इ०.

८८. जर विशेष्याचें रूप सविभक्तिक असलें तर त्याच्या विशेषणास ती विभक्ति न लागतां त्याचें नुसतें सामान्यरूप राहतें; जसें—**शाहण्या** मुलास, **शाहण्या** अ० **शाहणे** मुलीचा, **तांबड्या** फुलांनीं, इ०.

वरील विशेषणांस गुणविशेषणें म्हणतात.

८९. संख्या दाखविणारीं जीं विशेषणें तीं **संख्याविशेषणें** जाणावीं; जसें—**एक, दोन, पांच, शंभर, हजार,** इ० या विशेषणांत **क्रमवाचक, संख्यांशवाचक,** आणि **आवृत्तिवाचक,** असे आणखी भेद आहेत. संख्येंत क्रम दाखवितें तें **क्रमवाचक** संख्याविशेषण; जसें—**पहिला, दुसरा, पांचवा, दाहवा,** इ०; संख्येचा अंश दाखवितें तें **संख्यांशवाचक** संख्याविशेषण; जसें—**अर्धा, पाव, पाऊण, दीड, अडीच, साडेसात,** इ०; आणि आवृत्ति दाखवितें तें **आवृत्तिवाचक** संख्याविशेषण; जसें—**दुप्पट, तिप्पट, चौपट, दसपट, दशगुणित, शतगुणित,** इ०.

## ( ई ) क्रियापदविचार.

९०. ज्या शब्देंकरून कोणत्याही क्रियेचा अथवा स्थितीचा

**बोध** होतो तें क्रियापद जाणावें; जसें-**करणें, बोलणें, चालणें, निजणें, असणें,** इ०.

९१. क्रियापदाचे आठ भेद आहेत, त्यांत अर्थावरून पांच- **सकर्मक, अकर्मक, उभयविध, भावकर्तृक,** आणि **सहाय;** आणि रूपावरून तीन-**शक्य, प्रयोजक, गौण** अ० **सिद्ध.**

९२. ज्या क्रियेचा व्यापार कर्त्यापासून निघून दुसऱ्या पदार्थावर घडतो, ती क्रिया दाखविणारें क्रियापद **सकर्मक** होय; जसें-' बाळा पोथी वाचतो, ' यांत **वाचणें** या क्रियेचा व्यापार बाळापासून निघोन पोथीवर घडतो, ह्मणोन **वाचतो** हें सकर्मक क्रियापद. तसेंच-**मारितो, करितो, बोलतो, लिहितो, फोडितो, जोडितो,** इ० हीं **सकर्मक** क्रियापदें जाणावीं.

९३. एखाद्या क्रियेचा व्यापार कर्त्यापासून निघोन ज्या दुसऱ्या पदार्थावर घडतो, तें त्या क्रियापदाचें **कर्म** होय, आणि ज्यापासून तो व्यापार निघतो तो **कर्ता;** जसें-'रामा पोथी वाचतो,' यांत रामापासून वाचण्याची क्रिया निघोन ती पोथीवर घडत्ये, ह्मणोन **रामा** हा **वाचतो** या क्रियापदाचा **कर्ता,** आणि **पोथी** हें **कर्म** होय.

९४. ज्या क्रियेला याप्रमाणें कर्म नसतें ह्मणजे जिचा व्यापार कर्त्यावरच असतो तें **अकर्मक** जाणावें; जसें- ' बाळा असतो, ' यांत असण्याचा व्यापार बाळासच धरून राहतो. तसेंच-**निजतो, धांवतो, उठतो,** इ०. यांत केवळ स्थितीचाच बोध होतो.

सकर्मक आणि अकर्मक क्रियापदें ओळखायाची बहुधा सुगम रीति अशी आहे कीं, ज्यास भविष्य काळीं तृतीय पुरुषीं एकवचनीं ' ईल ' प्रत्यय लागतो तें सकर्मक आणि ' एल ' लागतो तें अकर्मक क्रियापद, जसें-करील, मारील, लिहील, वाचील, इ० हीं सकर्मक; आणि असेल, निजेल, बसेल, फुटेल, हंसेल, इ० हीं अकर्मक क्रियापदें जाणावीं.

( हीं सकर्मक आणि अकर्मक क्रियापदें ओळखायाच्या आणखीही रीति आहेत, त्या सविस्तर पाहणें असल्यास माझें मोठें व्याकरण पाहावें. )

९५. क्रियापदाचें जें मूळचें रूप त्यास **धातु** ह्मणतात.

९६. कित्येक धातु सकर्मक असतात, आणि अकर्मकही असतात, त्यांस **उभयविध** धातु ह्मणावें; जसें **मोडणें** याचें सकर्मक उदाहरण,—'त्याणें आपलें घर मोडिलें,' आणि अकर्मक उदाहरण,—'त्याचें घर मोडलें;' याच प्रमाणें—**उघडणें, झांकणें**, इ०.

९७. अकर्मक क्रियापद असून जेथें क्रियेचा भाव म्हणजे मूळ अर्थ तोच कर्ता असतो व ज्याचा प्रयोग तृतीय पुरुषीं एकवचनीं मात्र होतो, तेथें तें **भावकर्तृक** क्रियापद जाणावें; जसें—**कळमळतें, सांजावलें, फावलें**, इ०.

९८. जें क्रियापद धातूच्या रूपाशीं योजिलें असतां त्याचा काळ व अर्थ फिरवितें तें **सहाय** क्रियापद जाणावें; जसें—**अस, नस, हो, जा, ये, दे, लाग, बस, पाहिजे, नको, नये, नलगे**, इ०.

९९. ज्या क्रियापदाच्या रूपांत शक्तीचा अर्थ असतो, तें **शक्य** क्रियापद जाणावें; जसें—'हें काम माझ्यानें करवतें,' ह्मणजे हें काम करायाची मला शक्ति आहे, हें मजकडून करविलें जातें, असा अर्थ; तसेंच—**देववतें, घेववतें, जाववतें**, इ०.

हीं क्रियापदें मूळ धातूस 'वणें' आणि 'ववणें' प्रत्यय लागून सिद्ध होतात. यांत एकाक्षरी धातूस 'ववणें' हा प्रत्यय लागतो.

१००. मूळ कर्ता एक असून दुसऱ्याकडून एखादी क्रिया घडविण्याचा अर्थ जेव्हां मूळ धातूस प्रत्यय लागून उत्पन्न होतो, तेव्हां त्या क्रियापदास **प्रयोजक** क्रियापद म्हणावें; जसें—'रामा गोपाळाकडून तें काम करवितो,'

यांत **करवितो** हें **प्रयोजक** क्रियापद जाणावें; तसेंच—**नेसवितो, लिहवितो, मारवितो,** इ०.

यांत मूळ धातूस 'विवणें' अथवा 'इवणें' हा प्रत्यय लागतो, जर तो मूळ धातु 'ह' कारवर्जित एकाक्षरी असला तर 'विवणें' प्रत्यय लागतो; जसें--खाविवणें, लिहविवणें, गाविवणें, नेविवणें, घेविवणें, इ०, आणि अनेकाक्षरी असला तर 'इवणें;' जसें—करिवणें, बोलिवणें, बदलविणें, इ०.

१०१. सहाय धातूंतून ज्यांचीं रूपें मूळचीं सिद्ध असतात, आणि जीं नियमित अर्थीं, नियमित काळीं, आणि नियमित पुरुषीं मात्र साधतात, त्यांस **गौण** अ० **सिद्ध** क्रियापदें म्हणतात; तीं—**पाहिजे, नको, नलगे,** आणि **नये** हीं होत.

१०२. क्रियापदास **रूप, भेद, अर्थ, प्रयोग, काळ, पुरुष, लिंग,** आणि **वचन** हीं असतात.

१०३. कोणत्याही धातूस 'होय' अथवा 'नाहीं' या अर्थानें चालविलें असतां जो त्यांत फेरफार होतो त्यास **रूप** ह्मणावें. हीं रूपें दोन प्रकारचीं आहेत—**करण रूप,** आणि **अकरण रूप;** उदाहरण, मीं—आहें, होतों, करितों, केलें, करीन, हें **करण रूप;** आणि मीं—नाहीं, नव्हतों, करीत नाहीं, केलें नाहीं, करणार नाहीं, हें **अकरण रूप.**

१०४. अर्थाच्या भेदानें मूळ धातूच्या रूपांत विकार होऊन जो नवा क्रियारूप शब्द सिद्ध होतो तो **भेद** जाणावा. हे भेद तीन आहेत—**मूळरूप भेद, प्रयोजक भेद,** आणि **शक्य भेद;** जसें—'मीं करितों,' 'म्यां केलें,' 'मी करीन,' हा **कर** धातूचा वर्तमान, भूत, आणि भविष्यकाळीं **मूळरूप भेद;** 'मीं करवितों,' 'म्यां करविलें,' 'मीं करवीन,' हा त्याच. काळीं **प्रयोजक भेद;** आणि 'माझ्यानें-करवतें, करवलें, करवेल,' हा तिन्हीं काळीं **शक्य भेद.**

१०५. एकादी क्रिया करण्याविषयींचा कर्त्याच्या मनांतला निरनिराळा भाव जेणें करून कळतो, अशीं जीं क्रियापदांचीं रूपें, त्यास **अर्थ** म्हणावें. हे अर्थ पांच आहेत—**स्वार्थ, आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ,** आणि **संशयार्थ.**

( **अ** ) जेथें बोलणारा नुसतें होय किंवा नाहीं सांगतो तेथें **स्वार्थ** जाणावा; जसें—'तो करितो,' 'त्याणें केलें,' 'तो करणार नाहीं,' 'तो गेला नाहीं,' इ०.

( **आ** ) जेथें बोलणारा आज्ञा, उपदेश, अथवा प्रार्थना करितो तेथें **आज्ञार्थ** जाणावा; जसें—'रामा हें काम कर,' 'मुलांनों, तुम्हीं खोटें बोलूं नका,' 'बाबा मला एक पुस्तक घेऊन द्या,' यांत 'कर,' 'बोलूं नका,' आणि 'घेऊन द्या,' इ०.

( **इ** ) जेथें क्रियापदाच्या रूपापासून धर्म, शक्यता, योग्यता, इ० अर्थ निघतात, तेथें **विध्यर्थ** जाणावा; जसें—'त्याणें करावें,' 'म्या जावें,' 'तुम्हीं त्यास मारूं नये,' इ०.

'त्याणें करावें' ह्मणजे करणें हा त्याचा धर्म आहे. करण्याची त्यास मोकळीक आहे, करणें त्यास योग्य आहे, असे अनेक अर्थ उत्पन्न होतात. 'त्वां लहानपणीं आईस नित्य ग्रास द्यावा'—एथें रीति, मागल्या गोष्टीचें स्मरण; 'आतां पाऊस पडावा' एथें अटकळ; असे आणखीही अर्थ निघतात.

( **ई** ) अमुक केलें तर अमुक होईल अशा संकेताचा अर्थ जेव्हां क्रियापदाच्या रूपापासून निघतो, तेव्हां तेथें **संकेतार्थ** जाणावा; जसें—'तो मला पत्र लिहिता, तर मीं जातों,' 'त्याणें माझें काम केलें असतें, तर म्यां त्याचें काम केलें असतें,' इ०.

( **उ** ) जेव्हां क्रियापदाच्या रूपावरून संशयाचा अर्थ निघतो तेव्हां त्याचा **संशयार्थ** जाणावा; जसें—'तो बोलला असेल,' 'ती जात असली तर बरें,' इ०.

१०६. जेथें वाक्यांत कर्ता, कर्म, आणि भाव, यांच्या

लिंगवचनावरून क्रियापदाचें रूप फिरतें, तेथें त्या विकारास **प्रयोग** असें ह्मणतात; उदाह०—'रामा करितो,' 'गाय दूध देत्ये,' 'तो गेला,' 'त्याणें पुस्तक वाचिलें,' 'त्याणें पोथी लिहिली,' 'त्याणें त्यास मारिलें,' 'रामाला बोलाविलें,' 'मला वाटतें,' 'त्यास तेथेंच सांजावलें,' इ०. या वाक्यांत निरनिराळे प्रयोग आहेत.

प्रयोग चार आहेत—**कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग, भावीप्रयोग,** आणि **भावकर्तरिप्रयोग.**

( **अ** ) जेथें कर्त्याच्या लिंगवचनावरून क्रियापदाचें रूप फिरतें, तेथें **कर्तरिप्रयोग** जाणावा; जसें—'रामा निजतो,' 'गंगा आली,' 'मुलगें रडतें,' 'शेळ्या चरतात,' 'घोडें धांवलें,' इत्यादि.

( क्रियापद सकर्मक किंवा अकर्मक असेल त्याप्रमाणें या प्रयोगाचे सकर्मक कर्तरी व अकर्मक कर्तरी असे भेद होतात. )

( **आ** ) जेथें कर्माच्या लिंगवचनावरून क्रियापदाचें रूप फिरतें, तेथें **कर्मणिप्रयोग** जाणावा; जसें—'त्याणें पुस्तक वाचिलें,' 'म्यां घोडा बांधिला,' 'तिणें रांगोळ्या घातल्या,' इ०.

( **इ** ) जेथें कर्त्यावरून अथवा कर्मावरून क्रियापदाचें रूप न फिरतां केवळ सामान्येंकरून त्याचें रूप नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, तेथें **भावीप्रयोग** जाणावा; जसें—'त्याणें त्यास मारिलें,' 'तिणें तिला धरावें,' 'म्यां त्यास बलाविलें असतें,' 'म्यां बसावें,' इ०.

( **ई** ) जेथें क्रियेचा जो भाव तोच कर्ता दिसतो, आणि क्रियापदाचें रूप निरंतर नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, तेथें **भावकर्तरीप्रयोग** जाणावा; जसें—'मला कळमळतें,' 'त्यास तेथेंच सांजावलें,' 'तुला फावलें तर तूं जा,' इ०.

## कालविचार.

१०७. क्रियापदाच्या रूपावरून ती क्रिया अमक्याकाळीं घडली असा जो बोध होतो, त्यास **काळ** असें ह्मणावें. मुख्य काळ तीन आहेत—**वर्तमान, भूत,** आणि **भविष्य.** परंतु या प्रत्येकांत आणखी भेद आहेत.

१०८. जो सध्या चालत आहे तो, अथवा ज्या काळीं एकादी क्रिया घडत्ये तो त्या काळीं त्या क्रियेचा **वर्तमान काळ** जसें—'मीं करितो,' 'तो जातो,' 'ती पाहत्ये,' 'त्या मुली उड्या मारितात,' 'जेव्हां तो लिहितो असें म्यां पाहिलें,' इ०.

१०९. जो मागें गेला तो **भूत काळ;** जसें—'म्यां केलें,' 'तो गेला,' 'तिणें पाहिलें,' 'त्या मुलींनीं चित्रें काढिलीं,' इ०.

११०. पुढें येणारा तो **भविष्य काळ;** जसें-'मीं करीन,' 'तो जाईल,' 'ती पाहील,' 'त्या मुली खेळतील,' इ०.

१११. वर्तमान काळाचे तीन भेद आहेत—**वर्तमान, अपूर्णवर्तमान,** आणि **रीतिवर्तमान.**

### उदाहरणें.

मीं करितों........................................ वर्तमान.
मीं करित आहें; मीं करितों आहें ........ अपूर्णवर्तमान.
मीं करीत असतों ........................ रीतिवर्तमान.

११२. भूत काळाचे सात भेद आहेत;—**भूत, वर्तमानभूत, भूतभूत, अपूर्णभूत, रीतिभूत, पूर्णभूत** आणि **भविष्यभूत.**

### उदाहरणें.

मीं अ० म्यां केलें........................... भूत.
मीं अ० म्यां केलें आहें...................... वर्तमानभूत.
मीं अ० म्यां केलें होतें......................: भूतभूत.

मीं करीत होतों ........................ अपूर्णभूत.
मीं करीं अ० करित असें ................ रीतिभूत.
मीं करिता झालों........................ पूर्णभूत.
मीं करणार होतों........................ भविष्यभूत.

११३. भविष्य काळाचे पांच भेद आहेत;-**भविष्य, अपूर्णभविष्य, वर्तमानभविष्य, भूतभविष्य,** आणि **भविष्यभविष्य.**

## उदाहरणें.

मीं करीन............................ भविष्य.
मीं करीत असेन...................... अपूर्णभविष्य.
मीं करणार आहें...................... वर्तमानभविष्य.
मीं केलें असेन....................... भूतभविष्य.
मीं करणार असेन..................... भविष्यभविष्य.

## **पुरुष, लिंग,** आणि **वचन** विचार.

### पुंल्लिग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्रथम. | **मीं करितों.** | **आह्मीं करितों.** |
| द्वितीय. | **तूं करितोस.** | **तुह्मीं करितां.** |
| तृतीय. | **तो करितो.** | **ते करितात.** |

### स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | **मीं करित्यें.** | **वरच्या प्रमाणें.** |
| द्वि० | **तूं करित्येस-तीस.**[1] | |
| तृ० | **ती करित्ये- ती करिती.**[1] | **त्या करितात.** |

(१) यांत द्वितीय आणि तृतीय पुरुषांचीं हीं दुसऱ्या प्रकारचीं रूपें निवळ देशस्थ लोकांत आढळतात.

### नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं करितें. | वरच्या प्रमाणें. |
| द्वि० | तूं करितेस. | |
| तृ० | तें करितें. | तीं करितात. |

यांत प्रथम आणि द्वितीय पुरुषांच्या रूपांचा प्रयोग करण्याचा प्रसंग येत नाहीं.

## धातुरूपें.

११४. **अस, नस,** आणि **हो,** या सहाय धातूंच्या योगानें क्रियापदाचे काळ आणि रूपें फिरतात; ह्मणोन प्रथम या सहाय धातूंचीं रूपें चालवून दाखवितों.

### अस धातु—करण रूप, स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

### वर्तमानकाळ.

### प्रकार १ ला.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं आहें. | आह्मीं आहों. |
| द्वि० | तूं आहेस. | तुह्मीं आहांत-आहां. |
| तृ० | तो-ती- तें-आहे. | ते-त्या-तीं आहेत. |

यांत आहांत, आहां, यांचीं बहुधा अहांत, अहां, अशींच रूपें लिहितात.

### प्रकार २ रा.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होई. | आम्हीं होऊं. |
| द्वि० | तूं होस—होईस. | तुम्हीं व्हा. |
| तृ० | तो—ती-तें होय. | ते-त्या-तीं होत. |

### पुल्लिंग.

### प्रकार ३ रा.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असतों. | आम्हीं असतों. |

| | | |
|---|---|---|
| द्वि० | तूं असतोस. | तुम्हीं असता-तां. |
| तृ० | तो असतो. | ते असतात. |

## स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव. | अनेकव. |
|---|---|---|
| प्र० | मीं असत्यें. | } वरच्याप्रमाणें. |
| द्वि० | तूं असत्येस, अ० [1]असतीस. | |
| तृ० | ती असत्ये. अ० असती.[1] | त्या असतात. |

## नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकव. | अनेकव. |
|---|---|---|
| प्र० | मीं असतें. | } वरच्याप्रमाणें. |
| द्वि० | तूं असतेंस. | |
| तृ० | तें असतें. | तीं असतात. |

हीं रूपें रीति, नित्यत्व या अर्थी येतात.

## भूतकाळ.

## प्रकार १ ला.

## पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होतों. | आह्मीं होतों. |
| द्वि० | तूं होतास. | तुह्मीं होतेत-होतां. |
| तृ० | तो होता. | ते होते. |

यावरून इतर लिंगांचीं रूपें आणावीं.

## प्रकार २ रा.

## पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलों. | आह्मीं असलों. |
| द्वि० | तूं असलास. | तुह्मीं असलेत, असलां. |
| तृ० | तो असला. | ते असले. |

---

१ पृष्ठ २६ येथील टीप पहा.

## स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असल्यें. | आह्मीं असलों. |
| द्वि० | तूं असलीस. | तुह्मीं असल्यात. |
| तृ० | ती असली. | त्या असल्या. |

## नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असलें. | आह्मीं असलों. |
| द्वि० | तूं असलेंस. | तुह्मीं असलींत. |
| तृ० | तें असलें. | तीं असलीं. |

हीं दुसऱ्या प्रकारचीं रूपें संशयार्थी व संकेतार्थी देखील येतात.

## भविष्यकाळ.

## पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं असेन. | आह्मीं असूं. |
| द्वि० | तूं असलीस. | तुह्मीं असाल. |
| तृ० | तो-ती-तें असेल. | ते-त्या-तीं असतील. |

## नस धातु—अकरण रूप—स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

## वर्तमानकाळ.

## प्रकार १ ला.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नाहीं. | आह्मीं नाहीं. |
| द्वि० | तूं नाहींस. | तुम्हीं नाहींत. |
| तृ० | तो-ती-तें नाहीं. | ते-त्या-तीं नाहींत. |

## प्रकार २ रा.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नव्हें. | आह्मीं नव्हों. |

द्वि० तूं नव्हेस-नव्हस. तुह्मीं नव्हां-नव्हेत-नव्हत.
तृ० तो-ती-तें नव्हे. ते-त्या-तीं नव्हेत, अ० नव्हत.

## प्रकार ३ रा.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसतों. | आम्हीं नसतों. |
| द्वि० | तूं नसतोस. | तुह्मीं नसतां. |
| तृ० | तो नसतो. | ते नसतात. |

### स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसत्यें. | वरच्याप्रमाणें. |
| द्वि० | तूं नसत्येस-तीस[1] | |
| तृ० | ती नसत्ये-[1]ती. | त्या नसतात. |

### नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसतें. | वरच्याप्रमाणें. |
| द्वि० | तूं नसतेस. | |
| तृ० | तें नसतें. | तीं नसतात. |

## भूतकाळ.

## प्रकार १ ला.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नव्हतों. | आम्हीं नव्हतों. |
| द्वि० | तूं नव्हतास. | तुम्हीं नव्हतेत-नव्हतां |
| तृ० | तो नव्हता. | ते नव्हते. |

यावरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

---

(१) पृ० २५ एथील टीप पहा.

## प्रकार २ रा.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसलों. | आम्हीं नसलों. |
| द्वि० | तूं नसलास. | तुम्हीं नसलेत-नसलां. |
| तृ० | तो नसला. | ते नसले. |

यावरून इतर लिंगांचीं रूपें जाणावीं.

### भविष्यकाळ.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नसेन | आह्मीं नसूं. |
| द्वि० | तूं नसशील. | तुह्मीं नसाल. |
| तृ० | तो-ती-तें नसेल. | ते-त्या-तीं नसतील. |

## हो धातु करणरूप, स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

### वर्तमानकाळ.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | *मीं होतो. | आह्मीं होतों. |
| द्वि० | तूं होतोस. | तुह्मीं होतां. |
| तृ० | तो होतो. | ते होतात. |

### स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होत्यें. | वरच्याप्रमाणें. |
| द्वि० | तूं होत्येस-तीस. | वरच्याप्रमाणें. |
| तृ० | ती होत्ये-तीस. | त्या होतात. |

---

* या रूपांपैकीं कांहीं रूपें 'अस' धातूच्या भूतकाळाच्या रूपासारखीं आहेत ही गोष्ट विद्यार्थ्यानें लक्ष्यांत ठेवावी.

## नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होतें. | } पुल्लिंगाप्रमाणें. |
| द्वि० | तूं होतेंस. | |
| तृ० | तें होतें. | तीं होतात. |

## भूतकाळ.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं झालों | आह्मीं झालों. |
| द्वि० | तूं झालास. | तुम्हीं झालेत-झालां. |
| तृ० | तो झाला. | ते झाले. |

### स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं झाल्यें. | आम्हीं झालों. |
| द्वि० | तूं झालीस. | तुम्हीं झाल्यात-ल्यां. |
| तृ० | ती झाली. | त्या झाल्या. |

स्त्रीलिंगीं-असत्यें, असल्यें, नसत्यें, नसल्यें, करत्यें, गेल्यें, इ०. अशीं, आणि नपुंसकलिंगीं-असतें, असलें, नसतें, नसलें, करतें, केलें, गेलें, इ० अशींच रूपें लिहावीं.

(याविषयींची सविस्तर समजूत माझ्या मोठ्या व्याकरणांत पहावी.)

## भविष्यकाळ.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं होईन. | आम्हीं होऊं. |
| द्वि० | तूं होशील. | तुम्हीं व्हाल. |
| तृ० | तो-ती-तें होईल. | ते-त्या-तीं होतील. |

११९ आतां विद्यार्थ्यांस कोणत्याही क्रियापदाच्या रूपांचें रूप, भेद, अर्थ, प्रयोग, काळ इत्यादि समजावें ह्मणोन एक

धातु घेऊन तो संपूर्ण चालवून दाखविणें फार उपयोगी आहे, यास्तव तसें करून दाखवितों.

## कर धातु—करणरूप—मूळरूप भेद.

## स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

### वर्तमानकाळ.

मीं करितों..................................वर्तमान.
मीं करीत आहें, अ० करितों आहें ........ ...अपूर्णवर्तमान.
मीं करीत असतों..............................रीतिवर्तमान.

### भूतकाळ.

कर्मणिप्रयोग.

म्यां केला–ली–लें, इ० ..........................भूत.
म्यां केला–ली–लें आहें ..........................वर्तमानभूत.
म्यां केला–ली–लें होतें..........................भूतभूत.

कर्तरिप्रयोग.

मीं करीत होतों ..........................अपूर्णभूत.
मीं करीं अ० करीत असे.......... ........रीतिभूत.

रीतिभूत काळाचीं रूपें कांहींशीं विलक्षण होतात, ह्मणोन तीं एथें संपूर्ण दाखवितों, यावरून इतर धातूंचीं या काळाचीं रूपें साधावीं.

### रीतिभूतकाळ.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं करीं. | आम्हीं करूं. |
| द्वि० | तूं करीस. | तुम्हीं करा. |
| तृ० | तो–ती–तें करी. | ते–त्या–तीं करीत. |

मीं करिता झालों..........................पूर्णभूत.
मीं करणार होतों..........................भविष्यभूत.

## भविष्यकाळ.

मीं करीन..................................भविष्य.
मीं करित असेन..........................अपूर्णभविष्य.
मीं करणार आहें..........................वर्तमानभविष्य.
मीं करणार असेन.........................भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

कर्तरिप्रयोग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
| --- | --- | --- |
| प्र० | मीं करूं. | आम्हीं करूं. |
| द्वि० | तूं कर. | तुम्हीं करा. |
| तृ० | तो-ती-तें करू-करो. | ते-त्या-तीं करूत-करोत. |

## विध्यर्थ.

कर्मणिप्रयोग.

म्यां करावा—करावी—करावें, इ०...................वर्तमान.
म्यां करित असावा,—करित असावी, इ०........अपूर्णवर्तमान.
म्यां करावा होता, करावी होती, इ० ; अथवा, } भूत.
म्यां करायाचा होता, करायाची होती, इ०. }
म्यां केला असावा, केली असावी, इ०............वर्तमानभूत.

कर्तरिप्रयोग.

मीं करणार असावा....................................भविष्य.

## संकेतार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं करितों, तूं करितास, तो करिता, इ०...............भूत.
मीं करित असतों, तूं करित असतास, इ०........अपूर्णभूत.

कर्मणिप्रयोग.

म्यां केला असता, केली असती, इ०................भूतभूत.

## संशयार्थ.

मीं करित असलों........................वर्तमान.

कर्मणिप्रयोग.

म्यां केला असला, केली असली, इ० ...............भूत.

कर्तरिप्रयोग.

मीं करणार असलों........................ भविष्य.

मीं करित असेन ........................ अपूर्णभविष्य.

मीं केलें असेन........................ भूतभविष्य.

मीं करणार असेन........................ भविष्यभविष्य.

## कर धातु—करणरूप—प्रयोजक भेद.

## स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं करवितों ........................ वर्तमान.

मीं करवित आहें........................ अपूर्णवर्तमान.

मीं करवित असतों ........................ रीतिवर्तमान.

कर्मणिप्रयोग.

म्यां करविला-ली-लें इ० .................... भूत.

म्यां करविला-ली-लें आहे.................... वर्तमानभूत.

म्यां करविला-ली-लें होतें.................... भूतभूत.

कर्तरिप्रयोग.

मीं करवित होतों ........................ अपूर्णभूत.

मीं करवीं, अ० करवित असें................ रीतिभूत.

मीं करविता झालों........................ पूर्णभूत.

मीं करविणार होतों .................... भविष्यभूत.

मीं करवीन ........................ भविष्य.

मीं करवित असेन .................... अपूर्णभविष्य.

मीं करविणार आहें ...................... वर्तमानभविष्य.
मीं करविणार असेन ...................... भविष्यभविष्य.

## आज्ञार्थ.

कर्तरिप्रयोग.

| पुरुष. | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | मीं करवूं? | आम्हीं करवूं? |
| द्वि० | तूं करींव. | तुम्हीं करवा. |
| तृ० | तो-ती-तें करवो. | ते-त्या-तीं करवोत. |

## विध्यर्थ.

कर्मणिप्रयोग.

म्यां करवावा-वी-वें, इ० ...................... वर्तमान.
म्यां करवित असावा, इ० ...................... अपूर्णवर्तमान.
म्यां करवावा होता, इ० अथवा
म्यां करवायाचा, अ० करवावयाचा होता, इ०. } भूत.
म्यां करविला असावा, इ० .................. वर्तमान ...

कर्तरिप्रयोग.

मीं करविणार असावा ...................... भविष्य.

## संकेतार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं करवितों, तूं करवितास, तो करविता, इ०.... भूत.
मीं करवित असतों. तं करवित असतास, इ०.... अपूर्णभूत.

कर्मणिप्रयोग.

म्यां करविला असता, करविली असती, इ०.... भूतभूत.

## संशयार्थ.

कर्तरिप्रयोग.

मीं करवित असलों ...................... वर्तमान.

कर्मणिप्रयोग

म्यां करविला असला, इ०.................... भूत.

कर्तरिप्रयोग.

मीं करविणार असलों........................ भविष्य.

मीं करवित असेन............................ अपूर्णभविष्य.

कर्तरिप्रयोग.

मीं करविणार असेन ........................ भविष्यभविष्य.

कर्मणिप्रयोग.

म्यां करविला असेल, इ० .................... भूतभविष्य.

## कर धातु—करण रूप—शक्य भेद.

## स्वार्थ.

कर्तरिप्रयोग.

माझ्यानें अ० मला करवतें.................... वर्तमान.

———करवत आहे........................ अपूर्णवर्तमान.

———करवत असतें...................... रीतिवर्तमान.

———करवलें............................ भूत.

———करवलें आहे........................ वर्तमानभूत.

———करवलें होतें...................... भूतभूत.

———करवत होतें ...................... अपूर्णभूत.

———करवे, करवत असे.................. रीतिभूत.

———करवतें झालें...................... पूर्णभूत.

———मला करवणार होतें ............ भविष्यभूत.

———करवेल.... ........................ भविष्य.

———करवत असेल............ ........ अपूर्णभविष्य.

———करवणार आहे.................... वर्तमानभविष्य.

## आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला करवो.....................वर्तमान.

## विध्यर्थ.

*या अर्थी प्रशस्त रीतीनें रूपें होत नाहींत, ह्मणोन तीं एथें लिहिलीं नाहींत.

## संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला करवतें...................भूत.
————————करवत असतें.............अपूर्णभूत.
————————करवलें असतें............भूतभूत.

## संशयार्थ.

माझ्यानें अ० मला करवत असलें ..........वर्तमान.
————————करवलें असलें............भूत.
————————करवणार असलें..........भविष्य.
————————करवत असेल...........वर्तमानभविष्य.
————————करवलें असेल...........भूतभविष्य.
————————करवणार असेल..........भविष्यभविष्य.

११६. याप्रमाणें **नस** या सहाय धातूचीं रूपें **अस** या सहाय धातूच्या रूपांच्या ठिकाणीं लाविलीं असतां, अथवा कोठें कोठें **न** आणि **नये** हे शब्द लाविले असतां, अकरणरूपीं, सर्व भेदीं, सर्व अर्थीं, सर्व प्रयोगीं, सर्व काळीं, धातूंचीं रूपें सिद्ध होतात; जसें–'मीं करित नाहीं,' 'म्यां केलें नाहीं,' 'मीं करित नव्हतों,' 'मीं करीना, अ० न करीं अ० करित नसें,' 'केलें नव्हतें;' 'करणार नव्हतों;' 'करणार नसेन;' इ०.

११७. अकरणरूपीं आज्ञार्थीं, विध्यर्थीं, आणि संकेतार्थीं मात्र कांहीं फेरफार होतो तो दाखवितों.

## कर धातु—अकरण रूप.

### आज्ञार्थ.

#### वर्तमान काळ.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं करूं नको? | आम्हीं करूं नको? |
| द्वि० | तूं करूं नको. | तुम्हीं करूं नका. |
| तृ० | तो-ती-तें नकरू-नकरो. | ते-त्या-तीं नकरूत-नकरोत. |

### विध्यर्थ.

#### वर्तमान काळ.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | म्यां करूं नये, अ० नये करूं. | आम्हीं करूं नये अ० नये करूं. |
| द्वि० | त्वां करूं नयेस, अ० नयेस करूं. | तुम्हीं करूं नये, अ० नये करूं. |
| तृ० | त्याणें-तिणें करूं नये, अ० नये करूं. | त्यांहीं करूं नये, अ० नये करूं. |

### संकेतार्थ.

#### भूत काळ.

कर्तरिप्रयोग.

| पुरुष. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं न करितों अ० करितोंना. | आम्हीं न करितों, अ० करितोंना. |
| द्वि० | तूं न करितास, अ० करितासना. | तुम्ही नकरितेत, अ० न करितां, अ० करितेतना, अ० करितांना. |
| तृ० | तो न करिता, अ० करिताना. | ते नकरिते, अ० करितेना. |

११८. जा, ये, दे, लाग, बस, आणि पाह, हे व आणखी दुसरे कित्येक धातुही कोठें कोठें सहाय धातूंचीं कामें करितात; परंतु यांचीं रूपें मुख्य धातूंच्या नियमित धातुसाधितांच्या रूपांपुढें नियमित अर्थी आणि नियमित काळीं मात्र

लावितात; जसें–'तो विचार करीत नाहीं, उगीच लिहित **जातो**,' 'मारिला **गेला**,' 'त्याला चालतां **येत** नाहीं,' 'तो मारिला **जातो**,' 'तो मारिला **जातो**' 'मारिला **गेला**,' 'त्याला चालतां **येत** नाहीं,' 'तो त्यास जाऊं **देतो**,' 'त्याणें चोरास पळूं **दिलें**,' 'मीं तें काम करूं **लागलों**,' 'तो उगीच रंग लावित **बसतो**,' 'संभाळ, तो निसटूं **पाहतो**,' इ०.

( याविषयीं विस्तार माझ्या मोठ्या व्याकरणांत केला आहे तो पहावा. )

११९. सहाय धातूंतून ज्यांच्या केवळ नियामित रूपां-चाच प्रयोग नियमित अर्थीं, नियमित काळीं, नियमित पुरुषीं मात्र होतो, त्यांस **गौण** अथवा **सिद्ध** क्रियापदें म्हणतात; तीं–**पाहिजे**, **नको**, **नये**, आणि **नलगे**, हीं होत.

## उदाहरणें.

| | |
|---|---|
| मला पुस्तक पाहिजे. | त्याला पुस्तकें पाहिजेत. |
| मला कडू औषध नको. | तिला मळकीं वस्त्रें नकोत. |
| तुला गेलें पाहिजे. | मला निरंतर वाचायास पाहिजे |
| तूं जाऊं नको. | तुह्मीं निजूं नका. |
| त्याणें तें काम करूं नये. | आह्मीं असें ह्मणूं नये. |
| त्यास काम करणें नलगे. | तिला डागिणे व्हावेत. |

१२०. जेव्हां कर्मासच कर्ता करायाचा असतो, तेव्हां **जा** या धातूचा प्रयोग करितात. अशा प्रयोगास **कर्मकर्तरिप्रयोग** म्हणतात, जसें–'शिपाई चोर धरितो,' आणि 'शिपायानें चोर धरिला जातो,' यांत पहिल्या वाक्यांत चोर हें कर्म, आणि दुसऱ्या वाक्यांत अर्थ तसाच असून **चोर** हा कर्ता होतो. 'तो गाय बांधित नाहीं,' 'त्याच्यानें गाय बांधिली जात नाहीं,' 'त्या लढाईंत तो मारला गेला,' 'तुह्मास तो हुकूम केला जाईल,' इ० आणखी उदाहरणें.

( या कर्मकर्तरिप्रयोगाचा प्रचार इतर भाषांत फार आढळतो. या विषयाचा विस्तार माझ्या मोठ्या व्याकरणांत व त्याच्या पूरणिकेंत पहावा. )

१२१. धातूंवरून कितीएक नामें, विशेषणें, आणि अव्ययें साधतात; तीं खालीं त्यांच्या अर्थासुद्धां लिहून दाखवितों. यांस **धातुसाधितें** ह्मणतात.

## धातुसाधितें.

### मूळरूप भेद.

नामें आणि विशेषणें.

करणें ....................................क्रियावाचक.
कर्ता, अ० करता, करणार, करणारा ..........कर्तृवाचक.
केला, केलेला ..............................कर्मवाचक.

### अव्ययें.

करित, करितां, करितांनां ............ } वर्तमानकालवाचक.
करित असतां, करित असतांनां ........ }
केलें असतां केलें असतांनां ..................भूतकालवाचक.
करून ...................................पूर्वकालवाचक.
करूं, करायास, करावयास ..................निमित्तवाचक.
करावें, करावयाचें, करणें ..................विधिवाचक.

### प्रयोजक नामें.

### नामें आणि विशेषणें.

करविणें ...................................क्रियावाचक.
करविता, करविणार–रा .......................कर्तृवाचक.
करविला, करविलेला ..........................कर्मवाचक.

### अव्ययें.

करवित, करवितां, करवितांनां, } वर्तमानकालवाचक.
करवित असतां, करवित असतांनां. }

करविलें असतां, करविलें असतांनां........भूतकालवाचक.
करवून..................................पूर्वकालवाचक.
करवूं, करवायास, करवावयास..............निमित्तवाचक.
करवावें, करवायाचें—वयाचें................विधिवाचक.

## शक्य भेद.

### नामें आणि विशेषणें.

करवणें......................................क्रियावाचक.
करवलें, करवलेलें............................कर्मवाचक.

### अव्ययें.

करवत, करवतां, करवतांनां<br>करवत असतां, करवत असतांनां. } वर्तमानकालवाचक.
करवलें असतां, करवलें असतांनां...........भूतकालवाचक.

यांच्या मागें 'न' हें अव्यय योजिलें असतां अकरणरूपी धातुसाधितें होतात.

१२२. कित्येक धातूंचीं भूतकाळाचीं रूपें अनियमित होतात; त्यांतून कांहीं एथें सांगतों.

| धातु. | भूतकाळ. | धातु. | भूतकाळ. |
|---|---|---|---|
| **करणें.** | **केलें.** | **घालणें.** | **घातलें.** |
| **मरणें.** | **मेलें.** | **मागणें.** | **मागितलें.** |
| **जाणें.** | **गेलें.** | **सांगणें.** | **सांगितलें.** |
| **येणें.** | **आलें.** | **म्हणणें.** | **ह्मटलें, ह्मणालें.** |
| **होणें.** | **झालें.** | **पिणें.** | **प्यालें.** |
| **घेणें.** | **घेतलें.** | **भिणें.** | **भ्यालें.** |
| **देणें.** | **दिलें.** | **बिणें.** | **व्यालें.** |
| **उडणें.** | **उडालें.** | **पळणें.** | **पळालें.** |
| **इ०.** | **इ०** | **इ०.** | **इ०.** |

१२३. एका क्रियेच्या अर्थी दोन शब्दांचा प्रयोग होऊन जें क्रियापद साधतें त्यास **संयुक्त क्रियापद** म्हणावें; जसें—विकत घेणें, तोंडीं लावणें, जेऊं घालणें, श्रवण करणें, इ०.

## (उ) क्रियाविशेषण अव्ययें.

१२४. ज्या शब्दानें क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा अथवा अमुक अवस्थेंत अमुक काळीं अमुक स्थळीं ती क्रिया घडली, इत्यादि अर्थाचा बोध होतो, तो शब्द **क्रियाविशेषण** होय; जसें—'हळू चालतो,' 'फार खर्चतो,' 'हंसत जेवतो,' इ०; या वाक्यांत **हळू, फार, हंसत,** हीं क्रियाविशेषणें होत.

( अ ) यांत कित्येक **शुद्ध क्रियाविशेषण अव्ययें** असतात; जसें—हळू, लौकर, निमूट, पुनः, वारंवार, इ०.

( आ ) कित्येक **धातुसाधित क्रियाविशेषणें** असतात; जसें--खेळत, हंसत, खेळतां, हंसतांनां, खेळत असतां, खेळत असतांनां, इ०.

( इ ) कित्येक **शुद्ध विशेषणें** असून त्यांचा संबंध अथवा अन्वय क्रियेकडेस असतो; ( अशांचा भरणा मराठी भाषेंत फार आहे ) जसें—'तो चांगलें लिहितो,' 'ती गोड बोलत्ये;' 'त्या मधुर गातात,' इ०.

मराठी भाषेंत गुणविशेषणांचीं क्रियाविशेषणें होत असतां त्यांच्या रूपांत बहुधा कांहीं फेरफार होत नाहीं.

१२५. कित्येक क्रियाविशेषणें असून कर्त्याच्याच अनुरोधानें वागतात; जसें-ती **उगी** राहत्ये,' 'ते उभे राहतात,' 'त्या **आडव्या** जातात,' इ०.

१२६. क्रियाविशेषणें क्वचित् दुसऱ्याही क्रियाविशेषणाचा अथवा विशेषणाचा प्रकार दाखवितात; जसें—'तो **फार** लौकर बोलतो,' 'तो **मोठा** ठक आहे,' इ०.

१२७. मराठी भाषेंत अनुकरणवाचक शब्द निरंतर क्रियाविशेषणें असतात; जसें—फटकन, फटकर, फटादिनी, फटदिर्शी, गटकन, गटकर, गपगप, धसधस, पुरपुर, तुरतुर, फडफडां, दबादब, कडाकड, धडाधड, इ०.

अशा अनुकरणवाचक क्रियाविशेषणांचा भरणा मराठींत फार आहे.

१२८. कित्येक शब्दांस विभक्ति असतां त्यांचा प्रयोग केवळ अव्ययाप्रमाणें होतो; जसें—इतक्यांत, सकाळाला, दिवसास, दिवसाचा, रात्रीस, रात्रीं, तशांत, मोठ्यानें, अनशेपोटीं, अनवाणीं, इ०; उदा०—'इतक्यांत सूर्य मावळला,' 'तूं उद्यां सकाळाला ये,' 'तशांत मीं गेलों असतों,' 'तो मोठ्यानें ओरडला,' 'या अनवाणीं चालतात,' इ०.

१२९. **दर घरीं, दर गांवीं**, हे शब्द, आणि अशा अर्थीं जे—**घरोघर, गांवोगांव, दारोदार**, असे शब्द येतात, तींही क्रियाविशेषणें होत; उदा०-'तो दारोदार भटकतो,' 'मीं गांवोगांव फिरलों,' 'हीं झाडें एथें रानोरान असतात,' इ०.

१३०. कित्येक क्रियाविशेषण अव्ययें त्यांच्या अर्थासुद्धां एथें सांगतों.

**स्थलवाचक**.........तेथें, एथें, जेथें, इकडे, तिकडे, कोणीकडे, पलीकडे, कोठें, इ०.

**कालवाचक**........तेव्हां, एव्हां, जेव्हां, केव्हां, उद्यां, काल, आज, परवां, यंदा, गतसालीं, इ०.

**संख्यावाचक**.......एकदां, दोनदां, दहादां, शंभरदां, इ०.

**क्रमवाचक** .........पहिल्यानें, दुसऱ्यानें, इ०.

**निश्चयार्थक**........खचित, खरोखर, निःसंशय, इ०.

### ( ऊ ) उभयान्वयी अव्ययें.

१३१. ज्या अव्ययाचा संबंध दोन शब्दांकडेस अथवा

वाक्यांकडेस असून त्यांस जें जोडितें त्यास **उभयान्वयी अव्यय** ह्मणावें; जसें—आणि, जर, तर, परंतु, अथवा, किंवा, तरीं, जरीं, कांकीं, इ० उदाह०—'रामा आणि कृष्णा तेथें गेले आहेत,' या वाक्यांत **रामा** आणि **कृष्णा** या उभयतांचा **गेले आहेत** या क्रियेकडेस अन्वय जाणावा.

१३२ कित्येक उभयान्वयी अव्ययें अर्थासुद्धां सांगतों.

**समुच्चयवाचक**............आणि, व आणखी.

**पक्षांतरबोधक**............पण, परंतु, अथवा, किंवा, नाहीं तर, पक्षीं, इ०.

**न्यूनत्वबोधक**............कदाचित्, किंचित्, बहुधां, बहुत करून, प्रायः, इ०.

**कारणोभयान्वयीबोधक**..कारण, कांकीं, कांजर, त्यांस, इ०.

**संकेतोभयान्वयीबोधक**....जर, तर, जरीं, तरीं इ०.

## ( ऋ ) शब्दयोगी अव्ययें.

१३३. कोणत्याही स्थलवाचक अथवा कालवाचक शब्दांशीं ज्या अव्ययांचा योग होतो, तीं **शब्दयोगी अव्ययें** जाणावीं; ज्या शब्दांशीं यांचा योग अथवा अन्वय असतो, त्यांचें अव्ययांच्या योगानें सामान्यरूप होतें; जसें वर, खालीं, पुढें, मागें, नंतर, कडे, मध्यें, पूर्वीं, अगोदर, इ०. उदाहरण 'झाडा वर, घरा खालीं, घोडया पुढें,' इ०. यांत **वर, खालीं, पुढें** यांच्या योगानें **झाड, घर, घोडा,** यांचीं **झाडा. घरा, घोड्या,** अशीं सामान्यरूपें झालीं आहेत.

सामान्यरूपाशीं हीं शब्दयोगी अव्ययें मिळवून लिहिण्याची चाल प्रशस्त नाहीं. सामान्यरूपें निराळीं करून पुढें, अंतरानें शब्दयोगी अव्ययें लिहावीं; जसें—घरा पुढें, घोड्या वर, आते कडे, राजवाड्यासमोर, इ०. हें मला प्रशस्त दिसतें. या नियमाकडे कोणी लक्ष देत नाहीं ही थोडी दुःखाची गोष्ट आहे. परंतु परिपाठ पडला आहे तो बलवत्तर आहे.

१३४. **पावेतों, पर्यंत,** इत्यादि कित्येक शब्दयोगी अव्ययांच्या योगानें कोठें कोठें सामान्यरूप होत नाहीं; जसें-दोन महिने पावेतों, चार दिवस पर्यंत, सकाळ पर्यंत, इ०.

१३५. शब्दयोगी अव्ययांवरून **चा, ला,** आणि ईल प्रत्यय लिंगभेदें करून लाविले असतां ते शब्द विशेषणें होतात; जसें—वरचा, खालचा, पुढला, मागला, समोरलें, आंतील, बाहेरील, इ०.

१३६. **यांत** कित्येक **शुद्धशब्दयोगी** अव्ययें असतात. त्यांच्या योगानें सामान्यरूप होत नाहीं; तीं—**च, हि, ही, मात्र, ना, देखील,** इ०

हीं शुद्धशब्दयोगी अव्ययें ज्या शब्दांपुढें येतील त्यांशीं तीं जोडून लिहावीं.

## ( ऋ ) केवलप्रयोगी अ० उद्गारवाची अव्ययें.

१३७. ज्या अव्ययांच्या योगानें बोलणाराच्या मनांतील हर्षशोकादि विकार अथवा उद्गार समजतात, तीं **केवलप्रयोगी अ० उद्गारवाची अव्ययें** जाणावीं; जसें—अं:, छि:, छी, वाहवा, शाबास, भले, इ०. यांपुढें (!) असें चिन्ह करितात.

१३८. संबोधनीं जीं उद्गारवाचीं अव्ययें असतात तीं लिंगवचनाच्या अनुसंधानानें असतात.

| लिंग. | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| **पु०** | **अरे, रे, अगा, अजि.** | **अहो, हो, अजि.** |
| **स्त्री०** | **अगे, गे, अगो.** | |

## साधितशब्दविचार.

१३९. साधित शब्द दोन प्रकारचे आहेत. एक **शब्दसाधित** आणि दुसरा **धातुसाधित.**

(अ) शब्दावरून जे साधतात ते **शब्दसाधित**; जसें—माणुसपण, देवपण; खरेपणा, वेडेपणा; धिटाई, महागाई;

गुलामगिरी; पुणेकर, काशीकर; मारेकरी, भाडेकरी; झोपाळू, लाजाळू; पैठणी, शहागडी; शास्त्री, ज्योतिषी; खोडकर, विणकर; पाटिलकी, महारकी; दारूखोर, भांडखोर; दुकानदार, पोतदार; दम्या, खोकल्या, भांग्या; रानवट, भोळवट, कडवट; किफायतवार, बयादवार; बापुडवाणा, लाजिरवाणा; घरवाला, लेंकुरवाला, भाजीवाला; खाणावळ, दळणावळ; इ०.

हे शुद्ध मराठी साधित शब्द सांगितले.

१४०. संस्कृत साधित शब्द या भाषेंत फार येतात त्यांचा एथें विस्तार करितां येत नाहीं, परंतु त्यांतून थोडे जे मुख्य मुख्य आहेत ते सांगतों;—प्रापंचिक, व्यावहारिक, आनंदित, दुःखित, कोपिष्ठ, रागिष्ठ, भक्षणीय, गुणक, बाधक, ब्राह्मणत्व, लघुत्व, मधुरता, विद्वत्ता, श्रीमंत, बुद्धिमान, द्रव्यवान, यशवंत, पुत्रवती, सौभाग्यवती, वैष्णव, शैव, पौत्र, पार्थिव, इ०.

१४१. धातूवरून जे साधतात ते **धातुसाधित**; जसें-मार, तोड, रड; ठेंचा, ठेवा, झगडा; विकाऊ, विणाऊ, शिकाऊ; उडी, बुडी, थापडी; कोरींव, ओतींव; मोडका, रडका; दळण, कांडण, घुसळण, सारवण, तारण, पोषण; निजणार-रा, खाणार-रा; घडणावळ, धुणावळ; करणी, पेरणी; मिरवणें, खेळणें, बोलणें; लाञ्या, मान्या; इ०.

## सामासिकशब्दविचार.

१४२. दोन किंवा अधिक शब्द अथवा नामें मिळून जो एक शब्द होतो, अथवा एक नाम होतें, तें **सामासिक नाम** जाणावें; आणि या एकत्र जोडलेल्या शब्दांमध्यें जो परस्परांचा अर्थानें संबंध असतो त्यास **समास** असें ह्मणावें.

१४३. हे समास सात आहेत—**द्वंद्व, तत्पुरुष, कर्मधारय, बहुव्रीहि, द्विगु, मध्यमपदलोपी,** आणि **अव्ययीभाव.**

१४४. दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग होऊन मधल्या **आणि** या अव्ययाचा ज्यांत लोप होतो, ह्मणजे तें अव्यय नसतां जेथें एक शब्द होतो, तेथें तो **द्वंद्व समास** जाणावा; जसें—**इटीदांडू** ह्मणजे **इटी** आणि **दांडू** तो; याच प्रमाणें—**आईबाप, बहीणभाऊ, बापलेक, ब्रह्माविष्णुमहेष, इ०.**

१४५. या **द्वंद्व** समासाचा आणखीं एक प्रकार असा आढळतो कीं, जेथें दोन शब्द जोडले असतां आणखी त्या शिवाय इतर तशा जातीच्या पदार्थांचाही त्यांत संग्रह होतो; असें असलें ह्मणजे त्यास **समाहार द्वंद्व** ह्मणतात; जसें—**भाजीपाला**, ह्मटलें ह्मणजे केवळ **भाजी** आणि **पाला** इतके दोनच पदार्थ समजूं नयेत, तर सर्व प्रकारची शाकभाजी समजली पाहिजे; तसेंच—**कोळीमाळी, शेटसावकार, घरदार, मीठभाकर, शेतभात, वाणीउदमी,** इ०.

**भाकरीबिकरी, दगडबिगड, लहानसहान,** इ० शब्दही याच प्रकारचे जाणावे.

१४६. जेथें पूर्व शब्दाच्या विभक्तीचा संबंध पुढल्या शब्दाशीं असून विभक्तीचा लोप असतो, तेथें **तत्पुरुष** समास जाणावा; जसें—**द्विजदंड**, ह्मणजे द्विजाप्रत जो दंड तो, **कृपावलोकन** ह्मणजे कृपेनें जें अवलोकन तें, **देवघर** ह्मणजे देवाचें जें घर तें, **वनभोजन** ह्मणजे वनांतलें जें भोजन तें.

१४७. बोलणाराच्या मनांत उभय शब्दांचा भाव ज्यांत समान असतो, अथवा विशेष्यविशेषणांचा योग असून जेथें समास घडतो, तेथें **कर्मधारय** समास जाणावा; जसें—**काळपुरुष** ह्मणजे काळ हाच कोणी पुरुष, अथवा काळासारखा जो पुरुष तो; **तांबडमाती, काळमांजर, भवसागर,** इ०. आणखीं उदाहरणें.

**भाऊसभाऊ, आतेबहीण, चुलतसासरा, नातजांवई,** हीं आणखी याच समासाचीं उदाहरणें जाणावीं.

१४८. जेथें दोन शब्दांचा योग असतां तिसरा पदार्थ जाणिला जातो, तेथें **बहुव्रीहि** समास होतो; जसें—**चक्रपाणि,** ह्मणजे चक्र आहे पाणीच्या ठायीं ह्मणजे हातीं ज्याच्या तो—विष्णु; **चतुर्भुज, शशिशेखर,** इ०. आणखीं उदाहरणें.

१४९. पूर्व शब्द संख्यावाचक असून पुढल्या शब्दाशीं जेथें समास होतो. ( आणि हा समास बहुधा समाहारार्थीं ह्मणजे समुदायाच्या अर्थीं असतो तेथें **द्विगु** समास जाणावा; जसें **पंचपाळें,** ह्मणजे पांचा पाळ्यांचा समुदाय; याच प्रमाणें **पंचारती, पंचखाजे, अठराबाबू, बारभाई,** इ०.

१५०. दोन शब्दांच्या मधल्या पदाचा लोप होऊन जेथें समास होतो, तेथें **मध्यमपदलोपी** समास जाणावा; जसें—**साखरभात** ह्मणजे साखरेनें युक्त अथवा साखर घालून केलेला जो भात तो; याच प्रमाणें—**कातराविडा, घरजांवई,** इ०. आणखी उदाहरणें.

१५१. जेथें पूर्व शब्द अव्यय असून त्याचा पुढल्या शब्दाशीं संबंध असतो, आणि तें सारें सामासिक पद क्रियाविशेषण अव्यय असतें तेथें **अव्ययीभाव** समास जाणावा; जसें—**दरमजल, दरदिवस, हरघडी, गांवगन्ना,** इ०.

## कारकविचार.

१५२. क्रियेच्या संबंधानें जो नामांच्या विभक्तीचा अर्थ त्यास **कारक** ह्मणावें. हे विभक्तीचे अर्थ सहा आहेत:— **कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान,** आणि **अधिकरण.**

१५३. प्रथमा विभक्ती असतां क्रियेच्या संबंधानें तिचे दोन अर्थ असतात, **कर्ता** आणि **कर्म.** उ०—'रामा लिहितो,'

'बाळा चालतो,' 'गंगू रडल्ये,' इ०. यांत **रामा, बाळा,** आणि **गंगू** हे प्रथमान्त शब्द त्या त्या क्रियांचे **कर्ते** होत. आणि 'रामा पोथी लिहितो,' 'अहिल्या गीता वाचल्ये,' 'बाळा काम करितो,' 'गंगू गाय बांधिल्ये,' इ०. यांत **पोथी, गीता, काम,** आणि **गाय,** हीं प्रथमान्त नामें त्या त्या क्रियांचीं कर्मे होत.

१९४. द्वितीयान्त नामें कर्मे असतात; उदाह०—'बाळा गोपाळास मारितो,' 'आई मुलांस राखिल्ये,' 'त्याणें त्याला पाळिलें,' यांत गोपाळास, इ०. द्वितीयान्त नामें त्या त्या क्रियांचीं कर्मे होत.

द्वितीयेचीं आणि चतुर्थीचीं रूपें सारखीं होतात; ह्मणोन जेथें कर्माचा अर्थ नसतो तेथें तीं चतुर्थीचीं रूपें मानावीं.

१९५. तृतीयेचे अर्थ पुष्कळ आहेत, परंतु त्यांत मुख्य **कर्ता** आणि **करण** हे दोन आहेत. एकादी क्रिया करायाचें जें साधन, ह्मणजे ज्याच्या योगानें ती क्रिया घडत्ये, त्यास **करण** ह्मणावें; उ०—'नानानें चाबकानें आपल्या घोड्यास मारिलें,' 'पांडूनें लेखणीनें धडा लिहिला,' यांत **नानानें** आणि **पांडूनें** हीं तृतीयान्त नामें त्या त्या क्रियांचे **कर्ते** होत; आणि **चाबकानें** आणि **लेखणीनें** हीं नामें तृतीयान्त खरीं; परंतु या तृतीयेचा अर्थ **करण** होय.

१९६. ज्या कारणें व ज्याच्या साठीं, एकादी क्रिया घडते तें **संप्रदान**; चतुर्थीचा अर्थ संप्रदान असतो; उदाह०—'नानानें पांडूला धडा शिकविला,' 'बाळानें भिकाऱ्यास पैसे वाटले,' यांत **पांडूला** आणि **भिकाऱ्यांस** ही संप्रदानार्थी चतुर्थी होय.

कोठें अधिकरणार्थीही चतुर्थी होत्ये; जसें—'तो डोकीस पागोटें गुंडाळितो,' 'तो रात्रीस जागतो,' इ०.

१५७. ज्या संबंधानें अवधीचा अथवा वियोगाचा अथवा अधिक उणेपणाचा बोध होतो, त्यास **अपादान** ह्मणावें; पंचमी विभक्तीचा हा **अपादान** अर्थ असतो. उदाह०— 'मुंबईहून पुणें साठ कोस आहे'; 'तो घरून आला,' 'त्याहून ती अधिक शहाणी आहे;' यांत **मुंबईहून, घरून,** आणि **त्याहून,** या पंचमीचा अर्थ अपादान होय.

१५८. ज्या ठिकाणीं अथवा ज्या काळीं एकादी क्रिया घडत्ये, तें ठिकाण, आणि तो काळ, यास **अधिकरण** ह्मणावें; सप्तमीचा अर्थ अधिकरण होतो. उदाह०—'तो घरांत नाहीं' 'तो गांवांत फिरतो' या वर्षीं पाऊस चांगला पडला' यांत **घरांत, गांवांत,** आणि **वर्षीं** ही अधिकरणार्थी सप्तमी होय.

१५९. षष्ठी विभक्तीचा संबंध क्रियेशीं नसतो, परंतु इतर शब्दाशीं तिचा संबंध असतो, ह्मणोन ही विभक्ति कारकांत मानीत नाहीं. उ०—'नानाचा भाऊ पांडू;' 'वेणूच्या बहिणी सुंदरा व आहल्या;' 'रामाचें घर पुण्यांत आहे;' यांत **नानाचा वेणूच्या, रामाचें,** या षष्ठीचा अर्थ संबंध भाऊ, बहिणी, घर, या शब्दांशीं आहे.

## ३. वाक्यरचना.

१६०. वाक्यांत शब्दांची योजना कसकशी कोठकोठें करावी हें ह्या प्रकरणांत सांगितलें असतें. याविषयींचे नियम पुष्कळ आहेत; त्यांतून थोडे येथें सांगतों.

१६१. ज्यांत कर्ता आणि त्याची क्रिया पूर्णपणानें सांगितली असत्ये, त्यास **वाक्य** ह्मणावें; जसें 'नाना लिहितो, 'पांडूनें धडा वाचला,' 'रामा उद्यां गांवास जाईल,' इ०.

१६२. ज्यांत कर्ता आणि क्रिया असून अर्थाची समाप्ति

होत्ये तें **पूर्ण वाक्य** जाणावें; जसें–'बाबा जातो,' 'सुंदरा आपल्या वाड्यांत खेळत्ये,' इ०.

१६३. ज्यांत अर्थाची समाप्ति झाली नसत्ये तें **अपूर्ण वाक्य** जाणावें; जसें–'तो शिकत असतां,' 'त्याणें तितकें काम करून,' इ०.

१६४. आतां वाक्यरचनेविषयींचे कांहीं **मुख्य नियम** सांगतों.

**नियम १.** वाक्यांत पहिला कर्ता, दुसरें कर्म, आणि शेवटीं क्रियापद असावें. उदाह०–'बाळा पोथी लिहितो,' 'बाबा निरंतर देवाची भक्ति करितो,' 'तिनें त्या बायांचा चांगला आदरसत्कार केला,' 'जर तो गेला नसता, तर मीही गेलों नसतों.'

**नियम २.** विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणें त्याच्या विशेषणाचें लिंगवचन असलें पाहिजे, मग तें विशेषण अथवा त्याचें विशेष्य त्या वाक्यांत कोणीकडे कां असेना. उदाह०–'तेव्हां त्याणें त्याचा मुलगा बहुतेक गुणांनीं संपन्न आणि रंगानें गोरा, परंतु एका डोळ्यानें किंचित् तिरवा असा पाहिला;' 'चीन देशांत हिरवीं, पिंवळीं, तांबडीं आणि दुसऱ्या तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचीं पांखरें असतात.'

**नियम ३.** जर वाक्यांत पुष्कळ नामें एका पुढें एक असलीं, आणि त्या साऱ्यांस एकच विभक्ति, अथवा शब्दयोगी अव्यय लावायाचें असलें, तर त्यापुढें **हा** अथवा **असा** या सर्वनामाची योजना करून त्यास लावावें; उदाह०–'रामा, गोविंदा, मनी, विष्णु, **यांचा** बाप' 'माझें पागोटें, दुपेटा, शेला, रुमाल, **हीं** सारीं चोरीस गेलीं,' 'रामा, गोविंदा, हरि आणि विष्णु,' **यांच्या** पुढें त्याचें कांहीं चालावयाचें नाहीं. चोरी, लबाडी,

चहाडी, आणि दुसऱ्याची निंदा, हीं केलीं असतां त्यापासून दुःख उत्पन्न होतें.

**नियम ४.** जर एका क्रियापदाचे अनेक कर्ते असले तर शेवटल्या कर्त्याच्या लिंगवचनावरून क्रियापद फिरतें; उदाह०- 'तो आणि ती गेली;' 'गाड्या, घोडे, आणि उंटें, मागून चाललीं;' 'त्याणें आपलें स्नान, संध्या आणि जेवण आटोपलें,' इ०.

**नियम ५.** कोणतेंही क्रियापद असलें तरी त्यास कर्ता पाहिजे, मग, तो कर्ता त्या वाक्यांत स्पष्ट असो, अथवा बाहेरून आणावा लागो; उदाह०—'रामा त्याकडेस गेला, परंतु भेटला नाहीं,' या वाक्यांत **भेटला नाहीं** या क्रियापदास कर्ता नाहीं ह्मणोन हें वाक्य शुद्ध नाहीं.

**नियम ६.** पदार्थाचा अतिशयपणा दाखवायाचा असतां बहुधा एकवचनाचा प्रयोग करितात; उदाह०—'यंदां देशावर जोंधळा फार पिकला,' 'काल यात्रेंत पुष्कळ माणूस लोटलें होतें.'

**नियम ७.** रूढींत असल्याशिवाय बहुधा केवळ मराठी आणि संस्कृत शब्दांचा समास करूं नये; 'गांवप्रदक्षिणा,' 'हत्तिचर्म,' असें ह्मणूं नये—'ग्रामप्रदक्षिणा,' आणि 'हस्तिचर्म' असें ह्मणावें.

( या वाक्यरचनेचे पुष्कळ अगत्याचे नियम आहेत; ते माझ्या मोठ्या व्याकरणांत पहावे. )

## विरामचिन्हें.

१६९. ग्रंथ वाचतांना त्याचा अर्थ स्पष्ट समजाविण्याकरतां जागोजाग थांबावें लागतें, कोठें फार वेळ, आणि कोठें थोडा वेळ तरी थांबावें लागतें; हें जाणविण्याकरितां चिन्हें करितात, त्यांस **विरामचिन्हें** ह्मणतात. हीं विरामचिन्हें सहा आहेत.— (,) हें **स्वल्पविराम**, (;) हें **अर्धविराम**, (:) हें **अपूर्ण-**

**विराम** ( . ) हें **पूर्णविराम**, ( ? ) हें **प्रश्नचिन्ह**, आणि ( ! ) हें **उद्गारचिन्ह**.

१६६. सरळ लांब वाक्यांत जर दुसरीं लहान वाक्यें अथवा शब्द, थोडा विराम घेऊन निरनिराळीं दाखवायाचीं असलीं तर **स्वल्पविराम**.चिन्ह दिलें पाहिजे; जसें—'एक मुलगा, आपल्या आंधळ्या बापास हातीं धरून, भीक मागत फिरत होता.' 'त्यास जेव्हां गरीबी आली, तेव्हां त्याणें आपला घोडा, उंट, गाई आणि कुतरेंही विकलें.

१६७. जेथें एकाद्या लांब वाक्यांत लहान मोठीं वाक्यें संपतात, परंतु त्यांत अर्थाची समाप्ति होत नाहीं तेथें त्या लहान मोठ्या संपलेल्या वाक्यांपुढें **अर्धविराम** चिन्ह द्यावें; जसें—ईश्वराची भक्ति मनानें केली पाहिजे; मनाचें अर्पण न करितां नुसत्या द्रव्याचें अर्पण केल्यानें देव प्रसन्न होईल असें दिसत नाहीं; आणि याप्रमाणें साधूंचीं वाक्येंही आहेत; परंतु त्याचा लोक अगदीं विचार करीत नाहींत.'

१६८. एकाद्या लांब वाक्यांत जेव्हां एकाद्या सांगितल्या अर्थास बळ आणण्याकरतां उदाहरणाप्रमाणें दुसरें वाक्य प्रविष्ट करावें लागतें तेव्हां त्या वाक्यापूर्वी **अपूर्णविराम** चिन्ह द्यावें; उदाह०—'सर्वदेशांत साधुपुरुष होऊन गेले, ते असेंच ह्मणतात; आणि आपणही नित्य पाहतों: एथील सुख क्षणभंगुर आहे; ह्मणोन क्षणभंगुर सुखासाठीं लोभांत पडून पाप करूं नये.'

१६९. जेथें पूर्णपणें वाक्य संपतें तेथें **पूर्णविराम** द्यावा. उदाह०—'त्याचा मुलगा काल घरीं आला.' 'मीं काल एक घर विकत घेतलें.' 'त्याणें चोरास धरिलें, आणि तो त्याच्या मुसक्या बांधीत होता, इतक्यांत फौजदाराचे शिपाई येऊन त्यांहीं त्या चोरास चावडीवर नेलें.'

१६९. ज्या वाक्यांत **प्रश्न** केला असतो, त्या वाक्याच्या शेवटीं **प्रश्नचिन्ह** लिहावें. उदाह०–'तूं तेथें गेला होतास काय?' तुम्हीं इतकी खटपट कां करितां?

१७०. ज्या शब्दानें अथवा ज्या वाक्यांत, हर्ष, शोक, आश्चर्य. इ० मनाचे **भाव** दाखवायाचे असतात, त्या पुढें **उद्गारचिन्ह** लिहावें; उदाह०–अहा! केवढी मौज ही! अरे देवा, आह्मांवर केवढें मोठें संकट आहे!

## व्याकरण सांगणें.

१७१. कोणत्याही वाक्यांत सर्व शब्दांचा व्याकरण रीतीनें पदच्छेद कसा करावा हें विद्यार्थ्यास समजणें फार जरूर आहे, ह्मणोन ती पदच्छेद करण्याची अथवा **व्याकरण सांगण्याची** रीत खालीं दाखवितों.

**( १ ) तीं मुलें तेथें खेळतात.**

**तीं**–हें **तें** या दर्शक सर्वनामाचें नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें प्रथमेचें अनेकवचन. याचा संबंध मुलांकडे.

**मुलें**–हें **मूल** या अकारान्त सामान्य नामाचें, नपुसकलिंगीं, प्रथमेचें अनेक वचन. ही **कर्तरि** प्रथमा. हें **खेळतात** या क्रियापदाचा **कर्ता.**

**तेथें**–हें स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय; याचा **खेळतात** या क्रियापदाकडे अन्वय.

**खेळतात**–हें क्रियापद, **खेळ** या अकर्मक धातूचें करणरूपीं, मूळरूपभेदीं, स्वार्थीं, वर्तमानकाळीं, नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

यांत **मुलें** हा कर्ता, आणि **खेळतात** हें क्रियापद: हा **अकर्मककर्तरि** प्रयोग.

**त्यांहीं सरकारांत आजपर्यंत पुष्कळ अर्ज्या दिल्या;**

परंतु अद्यापि आमच्या वादाचा फैसला झाला नाहीं; तथापि लोक अशी अटकळ करितात कीं, ती मालमिळकत रामभाऊसच मिळेल.

**त्यांहीं**–हें **तो** या पुरुषवाचक सर्वनामाचें, पुल्लिंगीं, तृतीय पुरुषाचें, तृतीयेचें अनेकवचन; ही **कर्तरी** तृतीया, **दिल्या** या क्रियापदाचा कर्ता.

**सरकारांत**–हें **सरकार** या अकारान्त सामान्य नामाचें नपुंसकलिंगीं, सप्तमीचें एकवचन.

**आजपर्यंत**–हें कालवाचक क्रियाविशेषण अव्यय; याचा **केल्या** या क्रियापदाकडे अन्वय.

**पुष्कळ**–हें विशेषण अर्ज्यांचें.

**अर्ज्या**–हें **अर्जी** या ईकारान्त सामान्य नामाचें, स्त्रीलिंगी, प्रथमेचें अनेकवचन. ही **कर्मणि** प्रथमा; हें **दिल्या** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**दिल्या**–हें क्रियापद. **दे** या सकर्मक धातूचें, करणरूपीं, मूळरूपभेदी, स्वार्थी, भूतकाळीं स्त्रीलिंगीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

यांत **त्यांहीं** हा कर्ता, **अर्ज्या** हें कर्म, आणि **दिल्या** हें क्रियापद. हा **कर्मणि** प्रयोग.

**परंतु**–हें उभयान्वयी अव्यय.

**अद्यापि**–हें क्रियाविशेषण अव्यय. याचा **झाला नाहीं** या क्रियापदाकडे अन्वय.

**आमच्या**–हें **मी** या पुरुषवाचक सर्वनामाचें, षष्ठीचें अनेकवचनीं सामान्यरूप. **वादाचा** या सविभक्तिक **विशेष्याच्या** योगानें.

**वादाचा**–हें **वाद** या अकारान्त सामान्य नामाचें, पुल्लिंग, षष्ठीचें एकवचन; या षष्ठीचा **फैसला** या नामाकडे संबंध.

**फैसला**–हें **फैसला** या आकारान्त सामान्य नामाचें, पुल्लिंगीं प्रथमेचें एकवचन. ही **कर्तरि** प्रथमा; हें **झाला नाहीं** या क्रियापदाचा **कर्ता**.

**झाला नाहीं**–हें **हो** या अकर्मक धातूचें, अकरणरूपीं, मुळरूप भेदीं, स्वार्थीं, भूत काळीं, पुल्लिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **फैसला** हा कर्ता, आणि **झाला नाहीं** हें क्रियापद, हा **अकर्मककर्तरी** प्रयोग.

**तथापि**–हें उभयान्वयी अव्यय.

**लोक**–हें **लोक** या आकारान्त सामान्य नामाचें पुल्लिंगीं, प्रथमेचें अनेकवचन. ही **कर्तरि** प्रथमा. हें **करितात** या क्रियापदाचा **कर्ता**.

**अशी**–हें **अशी** या दर्शक सर्वनामाचें स्त्रीलिंगीं, प्रथमेचें एकवचन; याचा अन्वय **अटकळ** या नामाकडे.

**अटकळ** हें **अटकळ** या आकारान्त सामान्य नामाचें, स्त्रीलिंगीं, प्रथमेचें एकवचन. ही **कर्मणि** प्रथमा. हें **करितात** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**करितात**–हें **कर** या सकर्मक धातूचें करणरूपीं, मूळरूप भेदीं, स्वार्थीं, वर्तमानकाळीं, पुल्लिंगीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

यांत **लोक** हा कर्ता, **अटकळ** हें कर्म, आणि **करितात** हें क्रियापद. हा **सकर्मककर्तरि** प्रयोग.

**कीं**–हें उभयान्वयी अव्यय.

**ती**–हें **ती** या दर्शक सर्वनामाचें स्त्रीलिंगीं, प्रथमेचें एकवचन. याचा अन्वय **मालमिळकत** याकडे.

**मालमिळकत**–हें **मालमिळकत** या अकारान्त सामासिक नामाचें स्त्रीलिंगीं, प्रथमेचें एकवचन, हा द्वंद्व समास. ही **कर्तरि** प्रथमा, **मिळेल** या क्रियापदाचा कर्ता.

**रामभाऊस**–हें **रामभाऊ** या ऊकारान्त विशेष नामाचें, पुल्लिंगीं, चतुर्थीचें एकवचन.

**च**–हें शुद्धशब्दयोगी अव्यय.

**मिळेल**–हें **मिळ** या अकर्मक धातूचें, करणरूपीं, मूळरूप भेदीं, स्वार्थी, भविष्य काळीं, स्त्रीलिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन, यांत **मालमिळकत** हा कर्ता, आणि **मिळेल** हें क्रियापद; हा **अकर्मकर्तरि** प्रयोग.




OMBAY—PRINTED AT THE "TATVA-VIVECHAKA" PRESS.